साने गुरुजींच्या गोड गोष्टी : ५

# दुःखी





करी मनोरंजन जो मुलांचे । जडेल नाते प्रभुशी तयाचे ॥

सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी

''करी मनोरंजन जो मुलांचे।
जडेल नाते प्रभुशी तयाचे।।''

गोड गोष्टी : भाग पाचवा

# दुःखी

: लेखक :

सानेगुरुजी, एम्. ए.

सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी




किंमत १५ रूपये

**केशव भिकाजी ढवळे संस्था शताब्दी वर्ष गणेशचतुर्थी १९०० ते २०००**

पहिली आवृत्ती १९४१,
सव्वीसावी आवृत्ती १९९१
पुनर्मुद्रणे १९९२, १९९३, १९९४
१९९६, १९९८
बत्तिसावे पुनर्मुद्रण १९९९

**टाईपसेटिंग**
अक्षय फोटो टाइपसेटर्स
१- चित्रकूट
डॉ. आंबेडकर मार्ग, ठाणे ४०० ६०१

**मुद्रक**
जस्मिन आर्टस्
सदाशिव गणेश परूळकर
वडाळा उद्योग भवन
वडाळा, मुंबई ४०० ०३१

**प्रकाशक**
ज्योती धनंजय ढवळे
केशव भिकाजी ढवळे
पहिली भटवाडी, गिरगाव,
मुंबई ४०० ००४

# भावनांचा कल्लोळ - अनंत शब्दसृष्टी

प्रख्यात फ्रेंच कादंबरीकार व्हिक्टर ह्युगो याची Les Miserables 'दु:खी कष्टी' ही कादंबरी जगन्मान्य आहे. व्हिक्टर ह्युगो हाच फ्रेंच वाङ्मयातील अत्यंत तेजस्वी असा तारा आहे. त्याची प्रतिमा अपूर्व आहे. त्याच्या वर्णनशक्तीस तुलना नाही. लहान मुलांची चित्रे त्यानेच शब्दांत रंगवावी. भावनांचा कल्लोळ तो नाचवतो. त्याची शब्दसृष्टी अनंत आहे. त्याला कोणत्या एका धंद्यातील शब्द माहीत नाही असे नाही. त्याला सर्व दर्जांच्या व सर्व वर्गांच्या लोकांची माहिती आहे.

व्हिक्टर ह्युगो हा कवी, कादंबरीकार, नाटककार – सर्व काही आहे. तो कवी म्हणून श्रेष्ठ की कादंबरीकार म्हणून श्रेष्ठ, ते कसे सांगावे? परंतु बाह्य जग त्याला कादंबरीकार म्हणून अधिक जाणते. त्याची ९३ वी ही कादंबरी मराठीत आलेली आहे. मी गोड गोष्टींच्या या पाचव्या भागात Les Miserables कादंबरीची गोष्ट थोडक्यात सांगितली आहे. या गोष्टीला 'दु:खी' हे नाव मी दिले आहे.

१९३० मध्ये त्रिचनापल्लीच्या तुरुंगात असताना मी आमच्या सत्याग्रहींस ही गोष्ट तीन रात्री सांगत होतो. सारे स्तब्ध बसत व ऐकत. गोष्ट संपल्यावर आज सेवाग्रामला असलेले खानदेशाचे त्यागी थोर सेवक श्री. सुकाभाऊ चौधरी मला म्हणाले, 'गुरुजी पाश्चात्त्य वाङ्मयात असं सुंदर वाङ्मय असतं हे आम्हाला माहीत नाही.' पाश्चात्त्यांत सारा भ्रष्टाकार आहे, सारे जड व केवळ आधिभौतिक आहे, उदात्तता त्यांच्यांत नाही असा आपल्यांत बरेच दिवस समज असे.

मी ही गोष्ट कितीदा तरी तुरुंगात व बाहेर मुलांना सांगितली आहे. मी बहिणीकडे गेलो तर तिची मुले अजून माझ्याभोवती जमतात व 'मामा, ती वालजीची गोष्ट सांग,' असे म्हणतात. ह्युगोच्या कादंबरीतील मुख्य पात्राचे नाव 'जिन व्हाल्जिन' असे आहे. मी 'वालजी' ठेवले आहे.

तुरुंगात मी अनेक गोष्टी, कधी पाश्चात्त्य वाङ्मयातील, कधी इतर अशा सांगत असे. पुष्कळ मित्र मला म्हणत, 'गुरुजी, या गोष्टी एकदा लिहून काढा, म्हणजे खेड्यापाड्यांत मुलाबाळांना सांगायला उपयोगी पडतील.' मी म्हणत असे, 'वेळ होईल तेव्हा करीन सारं.' गोड गोष्टींचे पाच भाग देऊन त्यांना दिलेले वचन थोडे तरी पूर्ण करीत आहे. मी आता तुरुंगाच्या दारात पुन: आहे. तुरुंगात वेळ मिळाला, दौत-लेखणी मिळाली तर आणखी गोड गोष्टींचे भाग लिहीन किंवा इतर काही लिहून आणीन पुन: माझ्या आवडत्या महाराष्ट्रातील मुलाबाळांस देईन. तोपर्यंत आता प्रणाम.

१६-१२-४०

साने गुरुजी



भाग पाचवा : दुःखी

# अनुक्रमणिका




साधू — — — — — — — ५

अभागिनी व तिची लहान मुलगी — — १५

अघटित घटना — — — — — — २५

अटक — — — — — — — — ३८

समुद्रात — — — — — — — ४१

लिलीची भेट — — — — — — ४३

तो तरुण — — — — — — — ५२

भूत बंगला — — — — — — — ५७

प्रेमाचा अंकुर — — — — — — ६८

क्रांतीची ज्वाला भडकली — — — — ७३

अंमलदाराचा शेवट — — — — — ८०

लिलीचे लग्न — — — — — — ८२

शेवट — — — — — — — — ८४



दुःखी : प्रकरण पहिले

# साधू



नंदगाव जिल्ह्याचे गाव होते. नंदगावची वस्ती तशी फारशी नव्हती. वीस हजार जेमतेम लोकसंख्या असेल. फारसे उद्योगधंदे तेथे नव्हते. सरकारी कचेऱ्या वगैरे पुष्कळ होत्या. त्यामुळे नंदगावचे महत्त्व. शिवाय तेथे एक मोठा तुरुंग होता. लांबलांबचे कैदी नंदगावच्या तुरुंगात आणून ठेवण्यात येत.

तुरुंग म्हणजे पृथ्वीवरचा नरक. आज तुरुंग थोडे तरी सुधारलेले आहेत; परंतु त्या काळी तुरुंगांत अपरंपार हाल असत. कैद्यांना पशूंहूनही वाईट रीतीने वागवण्यात येई. जरा काही झाले की शिक्षा व्हायच्या. हातापायांत जड साखळदंड पडायचे. फटके केव्हा बसतील त्याचा नेम नसे.

तुरुंगातून मोठी शिक्षा झालेला कैदी जिवंतपणे बाहेर पडणे जवळजवळ अशक्य असे. तुरुंगातील हालअपेष्टा बाहेरच्या जगात सांगण्यासाठी तो कधी येत नसे. निराशेने त्याचे आयुष्य कमी होई व तो तुरुंगातच मरे. तुरुंगातील जीवन म्हणजे भयाण जीवन. कैदी रडला नाही असा एक दिवस जात नसे. सुस्कारे व अश्रू यांचेच वातावरण तुरुंगात असे.

एके दिवशी सायंकाळच्या वेळी नंदगावात एक मनुष्य हिंडत होता. तो उंच होता. हाडपेर मजबूत होते; परंतु तोंडावर चिंता होती. त्याच्याजवळ काही नव्हते. अंगावर फाटके कपडे होते. तो रात्रीपुरती निवाऱ्याची जागा बघत होता. तो एका हॉटेलात शिरला. त्याने थोडे खायला मागितले. तेथील एका जागेवर तो बसला.

'पैसे आहेत का रे भिकाऱ्या?'

'आहेत दोन आणे.'

'दोन आण्यांत काय देऊ?'

'जे देता येईल ते द्या.'

इतक्यात कोणी तरी त्या हॉटेलात आला. तो मालकाच्या कानात काही पुटपुटला व निघून गेला.

'ए भिकाऱ्या, इथं नाही तुला काही खायला मिळणार. इथून चालता हो. असशील चोरबीर. खाशील दोन आण्यांचं परंतु नेशील दोन हजारांचं. मोठे हुशार असता तुम्ही या कामात. चल नीघ, ऊठ.'

'एवढं खाऊन जाऊ दे. पुढं आणलेला घास मागं नेऊ नका.'

'ते काही नाही, तू आधी ऊठ.'

तो भिकारी बाहेर पडला. तो आणखी एका हॉटेलात शिरला; परंतु तेथेही मघासारखाच अनुभव आला. त्याला कोणत्याही खाणावळीत किंवा हॉटेलात जागा मिळेना. शेवटी एका मोठ्या घराच्या बाहेरच्या ओट्यावर तो बसला. थोड्या वेळाने तेथेच पडून राहिला; परंतु मालकाचा भय्या बाहेर आला. तो कुत्र्यापेक्षाही मोठ्याने अंगावर गुरगुरला. त्याने त्या अनाथाला हाकलून दिले.

आता तो गरीब बापडा गावाबाहेर निघाला. या गावात आपणास कोणीही निवारा देणार नाही असे त्याला वाटले. गावाबाहेर जावे, एखाद्या झाडाखाली पडावे असे त्याने ठरवले. तो आता दमून गेला होता. पोटात अन्न नव्हते, तरी चालत होता. शेवटी एका झाडाखाली तो बसला. त्याच्या डोळ्यांतून पाणी आले. तुरुंगातून सुटल्यावरही हे पोलिस का सारखे मागे, का यांचा ससेमिरा, असे त्याच्या मनात आले. एकदा चोर म्हणजे का कायमचा चोर? आम्हाला या जगात मग कोठेच का आधार नाही मिळायचा? अशा विचारात तो होता.

परंतु त्याचे अश्रू पाहून आकाशाला जणू वाईट वाटले. आकाशाचे तोंड काळवंडले. एकाएकी ढग जमा झाले. तारे दिसेनासे झाले. टपटप असा जाड थेंबांचा पाऊस पडू लागला. वाराही जोराने वाहू लागला. देवही आपल्या पाठीस लागला आहे असे त्या दुर्दैवी माणसास वाटले. देवाच्या आकाशाखाली तरी रात्रभर पडू, असे त्याला वाटत होते; परंतु ते आकाशही का रागावले?

माझ्याखाली निजू नको, भिजवून टाकीन, नाही तर ऊठ, असे का आकाश त्याला सांगत होते?

पाऊस जरा थांबला; परंतु रात्री खूप येणार अशी लक्षणे दिसत होती. इतक्यात तिकडून एक मनुष्य आला. तो नंदगावात जात होता. झाडाखाली एक दु:खी मनुष्य आहे असे पाहून तो थांबला.

'रात्रीच्या वेळी इथं का रे बसलास? आज मोठा पाऊस येणार.'

'मग कुठं जाऊ? मला घर ना दार, सगा ना सोयरा. कुठं जाऊ? या गावात कुणीही रात्रीपुरता आधार देईना.'

'असाच सरळ जा. मग उजव्या बाजूला वळ. तिथं एक लहानसं घर आहे. घराभोवती बाग आहे. त्या घरी तुला जागा मिळेल. तिथं सर्वांना परवानगी आहे. तिथं कधीही कोणाला नकार दिला जात नाही. जा, तिथं जा. त्या घरात एक साधू व त्याची बहीण राहातात. अनाथांचं ते घर आहे. जगानं टाकलेल्यांचं ते घर!'

असे सांगून तो भला मनुष्य निघून गेला. आमचा हा दुर्दैवी मनुष्य उठला व चालू लागला. काही वेळ चालल्यावर त्याला ते घर दिसले. कुत्री वगैरे तेथे नव्हती. तो घराजवळ आला. त्याने दार लोटले, तो ते उघडले. दाराला कडी नव्हती. एकदम कोणी तरी उठले. दिवा लावण्यात आला.

'कोण तुम्ही?' साधूने विचारले.

'मी एक अनाथ आहे. रात्रीपुरता आधार हवा. गावात कुणीही जागा देईना, शेवटी तुमच्याकडे आलो. तुम्ही तरी निराश करणार नाही असं मनात धरून आलो आहे.'

'या, बसा. हे घर तुम्हा सर्वांचे आहे. बसा हो, बसा इथं. निजायची वेळ झाली म्हणून आताच दिवा मालवून पडलो होतो. तुमचं जेवण वगैरे झालं आहे का?'

'नाही.'

'मग आधी जेवा. थांबा, मी ताईला उठवतो. तिला ताजा स्वयंपाक करायला सांगतो. अहो, तुम्ही म्हणजे देवच. देवाला का शिळंपाकं वाढायचं? आधी आज उरलंसुरलं नसेलही काही. तुम्ही इथं बसा. नाही तर पडा. तुम्हाला पाय धुवायला पाणी देतो हो आणून.' असे म्हणून तो साधू आत गेला. त्याने

दुसरा दिवा लावला. घरातून बादलीभर पाणी आणून दिले. त्या दुर्दैवी माणसाने पाय धुतले.

'हा घ्या फडका. याला पुसा पाय आणि आता इथं पडा. जरा विश्रांती घ्या. आता होईल स्वयंपाक. ताई व मी पटकन करू. आता घरच्यासारखं राहा. संकोच नको, बरं का?'

साधू आत गेला. ताईही उठली, चूल पेटली. ताजा ताजा स्वयंपाक तयार झाला. ताईने एक पत्रावळ मांडली; परंतु तिचा तो भाऊ म्हणाला, 'ताई, पत्रावळ नको. ते कपाटात चांदीचं ताट आहे ना, ते मांडू. त्या ताटाचा आज उपयोग करू आणि तो चांदीचा दिवा आहे ना, तो लावू. या पाहुण्यासमोर दिवा लावू. हसतेस काय ताई? या गरिबाला सर्वांनी हाकलून दिलं. आपण त्याचं सर्वोत्तम स्वागत करू. आपल्याकडे येऊन-जाऊन या दोन मोलाच्या वस्तू आहेत. चांदीचं ताट, माझ्या एका वाढदिवशी मागं मित्रानं दिलेलं आणि तो दिवा. तोही असाच एकानं दिला होता. आठवतं का तुला?'

'हो. 'तुम्ही सर्व हतपतितांना प्रेमाचा प्रकाश देता; सुष्ट दुष्ट म्हणत नाही, तुम्हाला काय देऊ? एक दिवा देतो; तुमचं जीवन म्हणजे प्रेमाचा दीप,' असं म्हणून त्या एका गृहस्थानं तो दिवा दिला होता. मी कशी विसरेन? मग काढू तो दिवा? तो लावू?'

'हं, काढ व लाव. मी त्यांना बोलावतो.'

पाट मांडण्यात आला, चांदीचे ताट ठेवण्यात आले. तो चांदीचा दिवा लावण्यात आला. किती सुंदर प्रकाश पडला होता! जणू त्या साधूच्या अंतरात्म्याचा तो प्रकाश होता. तो निराधार पाहुणा आत आला. ते स्वागत पाहून त्याचे हृदय उचंबळून आले. तो जेवायला बसला.

'आता पोटभर जेवा.'

'महाराज, माझं एवढं स्वागत कशाला? मी कोण आहे हे जर कळलं तर तुम्ही माझा तिरस्कार कराल. मी एक पापी, दुष्ट –'

'काही बोलू नका. मला काही ऐकवू नका. तुम्ही चांगले आहात. उगीच स्वतःला वाईट का समजता? मनुष्य परिस्थितीनं वाईट होतो. सामाजिक रचनेमुळं वाईट होतो. तुम्ही चांगले आहात. जेवा स्वस्थ मनानं. ताई, त्यांना वाढ ना!' साधू म्हणाला.

जेवण झाले. ताईने ताट लगेच घासून ठेवले. तो दिवाही तिने पुसून ठेवला. ती भावाला म्हणाली, 'भाऊ, हे कपाटात ठेव.'

'असेना का खालीच. ठेव भिंतीशी.' भाऊ म्हणाला.

'मी आता निजते.' ताई म्हणाली.

'थांब, आपल्या पाहुण्यांना पांघरायला लागेल ना! त्या गाठोड्यात एक शाल होती ना? ती दे काढून.'

ताईने शाल काढून दिली. दमलीभागलेली ताई झोपी गेली. साधूने पाहुण्यासाठी स्वच्छ सुंदर अंथरूण तयार केले. त्यावर ती शाल पांघरण्यासाठी ठेवली. नंतर तो त्या पाहुण्यास म्हणाला, 'या, आपण दोघे प्रार्थना करू.' पाहुणा आला. साधू व तो, दोघे शांतपणे बसले. त्या साधूने एक सुंदर प्रार्थना म्हटली. प्रार्थनेनंतर काही वेळ तो साधू डोळे मिटून बसला होता. नंतर तो पाहुण्यास म्हणाला, 'पाहा, आता तुम्हाला उशीर झाला. दमलेभागलेले तुम्ही, शांतपणं झोपा.'

दिवा मालवला गेला. साधू झोपी गेला. पाहुणाही झोपला. रात्री पाऊस फार पडला नाही. त्या झाडाखालून साधूच्या घरी ह्या अनाथ माणसाने यावे, एवढ्याचसाठी जणू तो पाऊस आला होता. आता आकाश निर्मळ होते. तारे चमचम करीत होते.

त्या पाहुण्याची एक झोप झाली. तो जागा झाला. त्याला आता झोप येईना. त्याच्या मनात निरनिराळे विचार येत होते. 'किती या साधूचा प्रेमळ स्वभाव! कसं यानं मला वागवलं, जणू मी त्याचा जावई, त्याचा देव! मला चांदीचं ताट, समोर चांदीचा दिवा! खरंच ते चांदीचं ताट खाली भिंतीशी ठेवलेलं आहे. तो दिवाही तिथंच आहे. त्या दोन्ही वस्तू मी लांबवल्या तर? काय हरकत आहे? मी भांडवलाशिवाय उद्या धंदा तरी कोणता करू? जवळ दिडकी नाही. साधूला काय करायच्या या चांदीच्या वस्तू? या झोपडीत चांदी शोभत नाही. पळवाव्या या दोन्ही जिनसा; परंतु ही कृतघ्नता आहे. ज्यांनी इतकं प्रेम दिलं, त्यांच्याच घरी का चोरी करू?

सर्व जगानं मला दूर लोटलं. या माहात्म्यानं पोटाशी धरलं. त्यानं माझ्यावर विश्वास टाकला. 'तू वाईट नाहीस, चांगला आहेस,' असं मला म्हटलं. त्याच्याकडे का चोरी करू? त्या साधूला काय वाटेल? त्याची ताई काय

म्हणेल? काही का म्हणत ना! म्हणतील, 'त्याला जरूर होती म्हणून त्या वस्तू त्यानं लांबवल्या.' नाही तर मी उद्यापासून जगायचं कसं हा प्रश्न आहे माझ्यासमोर! ही सदसद्विवेकबुद्धी कशाला कुरकुर करते? गप्प बस ग.' असे त्या पाहुण्याच्या मनात चालले होते. हो ना चालले होते. सदसद्वृत्तींचा झगडा चालला होता. शेवटी असद्वृत्ती विजयी झाली.



तो पाहुणा हळूच उठला. पाय न वाजवता मांजराप्रमाणे आत गेला. जरा थांबला. दोघांचे झोपेतील श्वासोच्छ्वास ऐकू येत होते. साधू शांतपणे झोपला होता. आत ताईही गाढ झोपेत होती. त्या पाहुण्यानं हळूच ते ताट व तो दिवा उचलून घेतला. तो बाहेर आला. सारे शांत होते. पांघरायला दिलेल्या

शालीत त्या चांदीच्या वस्तू गुंडाळून तो बाहेर पडला. कोणीही बघत नव्हते. वरून तारे फक्त पाहात होते. कोणी कुत्री तेथे भुंकायला नव्हती, परंतु आत सदसद्विवेकबुद्धी ओरडत होती.

पहाट झाली. साधू उठला. त्याने नित्याप्रमाणे शौचमुखमार्जन केले. त्याचा कार्यक्रम ठरलेला असे. बारा महिने तेरा काळ त्याप्रमाणे चालायचे. तो पहाटे उठे. नंतर झाडांना पाणी घाली. फुलझाडांना पाणी घाली. काही सुंदर फुले तोडून घेई. मग थोडी भाकर खाऊन तो गावातील गरीब वस्तीत हिंडायला निघे. साधू येण्याची लहानमोठी माणसे वाट बघत असत. सूर्याचे किरण येताच फुले फुलतात, त्याप्रमाणे साधूची प्रेमळ मुखमुद्रा पाहाताच सर्व गोरगरिबांना आनंद होई. तो सर्वांची चौकशी करी. कोणी आजारी वगैरे नाही ना ? विचारी. कोणी आजारी असेल त्याच्याकडे जाई. त्याचे जरा पाय चेपी; तोंडावरून, डोक्यावरून प्रेमाने हात फिरवी. केव्हा एखादे सुवासिक फूल त्याच्या अंथरुणाजवळ ठेवील. खिडक्या उघडया टाकील, घाण असली तर दूर करील, काही औषध सांगेल, जवळ असेल तर देईल, मुलांना गोष्टी सांगेल, कोणाला खाऊ देईल, अशा रीतीने त्याचा वेळ जाई. अकरा वाजेपर्यंत सर्व दरिद्रीनारायणाच्या वस्तीतून हिंडून आल्यावर तो स्नान करी. नंतर प्रार्थना करून जेवे. थोडा वेळ वामकुक्षी करी. नंतर काही वाची. पुन्हा एकदा गावातून हिंडून येई. सायंकाळी घरी येई. पुन्हा झाडांना, फुलझाडांना पाणी. नंतर बाहेर खाट टाकून पडे. जेवण व प्रार्थना झाल्यावर तो बाहेरच निजे. पाऊस असला तरच तो आत निजे. बाहेर खाटेवर पडून आकाशातील मंगल व पवित्र तारे पाहात पाहात तो झोपी जाई. साधू म्हणे, 'माझं काम एकच. दिवसा पृथ्वीवर फुलं फुलवणं व रात्री देवाच्या अंगणात आकाशातील फुलं बघणं.' साधू याप्रमाणे खरोखर वागे. तो पहाटे व सायंकाळी फुलझाडांना पाणी घालून त्यांच्यावर फुले फुलवी. इतकेच नव्हे तर गोरगरिबांच्या वस्तीत जाऊन तेथील स्त्री - पुरुषांना, लहानथोरांना सहानुभूतीचे पाणी देऊन त्यांची जीवने फुलवी, त्यांची मुखकमले फुलवी.

साधूची मोठी बहीण होती ती विधवा होती. तिला ना मूल ना बाळ. ती आपल्या भावाला मदत करी. तिचे त्याच्यावर फार प्रेम. त्याचे दुखले खुपले ती बघे. स्वयंपाक करी. मिळेल वेळ तेव्हा जप करीत बसे.

साधूच्या घराला कधी कुलूप नसे. तो प्रथम कडी लावी; परंतु पुढे कडी-कोयंडेही त्याने काढून टाकले. 'आपल्याला कसलं भय? आहे काय आपणाजवळ?' असे तो म्हणे. एखादे वेळेस ताई त्याला रागावे. 'तुला व्यवहार अगदीच कळत नाही' असे म्हणे; परंतु साधू हसे, गोड हसे.

आजही साधूचा तो कार्यक्रम सुरू झाला. तो फुले तोडीत होता. घरात ताई उठली. तिने चूल सारवली, सडासारवण तिने केले. ती चांदीची भांडी नीट पुसून कपाटात ठेवावी म्हणून ती आली. चांदीची भांडी दिसत ना! तो पाहुणाही कोठे दिसेना. 'भाऊ, अरे भाऊ!' तिने हाक मारली.

'काय ग ताई?'

'ते पाहुणे कुठं गेले?'

'अकस्मात आले. अकस्मात गेले. आपल्याकडून त्यांची अधिक सेवा व्हायची नव्हती. दुर्दैव आपलं.'

'खरंच दुर्दैव. अरे, तो लफंग्या होता. बहुतकरून चांदीचं ताट व दिवा घेऊन गेला! घरात दोन्ही वस्तू नाहीत. चोर असावा तो.'

'तरी तुला कधीपासून मी सांगत होतो की, या दोन वस्तू विकून टाकाव्या व पैसे गरिबांना द्यावे; परंतु तू ऐकलं नाहीस. प्रेमाच्या देणग्या का कुणी विकतो, असं आपलं तुझं सदानूकदा सांगणं. आपल्या घरात त्या वस्तू होत्या, म्हणून ना चोरी करण्याचा त्या पाहुण्याला मोह झाला? आपणच वाईट. गरीब लोक जगात उपाशी असता घरात सोनं-चांदी ठेवण्याचा अधिकार काय? ती गरिबांची रोटी आपण चोरून ठेवली होती. ताई, बरं झालं. घर निर्मळ झालं! आपल्यामुळं त्या पाहुण्याच्या हातून चूक झाली. आपला दोष; परंतु आता काय करायचं? असो.'

'तू घरात वाटेल त्याला घेतोस. मनुष्य कोण कसा असेल याचा विचारही तू करीत नाहीस. तू अगदी बावळट आहेस. जरा तरी विचार नको का करायला?'

'ताई, आपण स्वत: वाईट नाही ना वागत, एवढाच माणसानं विचार करावा! दुसऱ्यांची चिकित्सा मी कशाला करू? मला माझं जीवन निर्मळ करू दे. जगाला आपण चांगलंच म्हणावं. आपली श्रद्धा जगावर लादावी. आपला संकल्प जगावर लादावा. त्याचा आज ना उद्या केव्हा तरी परिणाम

होईल. आपण अविश्वासी माणसावरसुद्धा विश्वास टाकावा. त्याचा केव्हा तरी सत्परिणाम झाल्यावाचून राहाणार नाही. मनुष्याला सुधारायला हाच मार्ग. असो. मी आता जातो.'

'भाकर खाऊन जा. विसरलास वाटतं?'

'कर लौकर.'

बहीणभावांचे असे बोलणे चालले होते, तो तिकडून काही पोलिस एका माणसाला मारीत मारीत आणीत होते. ते साधूकडे येत होते. साधू अंगणात उभा राहिला. ताईही तेथे उभी राहिली.

'का मारता? मनुष्याला पशूप्रमाणं वागवू नये!' साधू म्हणाला.

'साधूमहाराज, यानं तुमच्याकडच्या वस्तू चोरल्या आहेत. चांदीचं ताट व चांदीचा दिवा. त्यांच्यावर तुमचं नाव आहे. हा चोर आहे. मोठा बदमाष आहे. कालच तो सुटला. आम्ही त्याच्या पाळतीवरच होतो. गावात त्याला कुठं जागा मिळू दिली नाही. तुम्ही त्याला जागा दिलीत. परंतु जिथं जेवला तिथं * * * फटके मारले पाहिजेत हरामखोराला!' मुख्य पोलिस म्हणाला.

'मी यांना ओळखतो. माझ्याकडे ते रात्री झोपले. मीच त्यांना ते ताट व तो दिवा देऊन टाकला. तुरुंगातून सुटल्यावर त्यांनी कुठं जावं? जवळ एक दिडकी नाही. मी त्यांना ह्या दोन वस्तू देऊन म्हटलं, या वस्तू विका. जे पैसे मिळतील त्यांच्या आधारे काही उद्योग करा. भाजीपाला विका. चिवडा-शेव विका. काही प्रामाणिक उद्योग करा. त्यांनी ह्या वस्तू चोरलेल्या नाहीत. उगीच संशयावरून त्यांना मारलंत. आधी तुम्ही मला विचारलं पाहिजे होतंत. सोडा त्यांना. एकदा कानफाटे नाव पडलं म्हणजे कायमचं पडतं. मनुष्य का नेहमीच वाईट असतो? आपल्या अशा दुष्ट वर्तनानं मात्र निराश होऊन तो खरोखरच वाईट बनेल. एवीतेवी चोर चोर नेहमी म्हणतात, तर करूच या चोरी; एवीतेवी दुष्ट दुष्ट म्हणतात, तर होऊच या दुष्ट, असं मनुष्य म्हणू लागतो. म्हणून दुसऱ्याविषयी नेहमी सत्संकल्प करावा. असो. जा तुम्ही. सोडा त्याच्या दंडाच्या दोऱ्या.' साधू म्हणाला.

'मग हा सांगत होता ते खरं एकूण?' पोलिस म्हणाले.

'काय सांगत होता?' साधूने विचारले.

'की त्या साधूबोवानं मला या दोन्ही वस्तू दिल्या आहेत. मी चोरल्या नाहीत; परंतु त्याच्या सांगण्यावर आमचा विश्वास बसेना. आता तुम्हीच सांगत आहा तर सोडतो याला; परंतु साधूमहाराज, जग काही फार चांगलं नाही.'

'ते चांगलं केलं पाहिजे. त्याला प्रेम हाच मार्ग.' साधू म्हणाला.

पोलिस निघून गेले. तो चोर तेथे उभा होता. त्याची मान खाली झाली होती. त्याच्या डोळ्यांतून पाणी येत होते.

'गड्या, हे पाणी तात्पुरत्या पश्चात्तापाचं न होता खऱ्या शेवटच्या पश्चात्तापाचं असू दे. तुझा आत्मा आज मी वाचवला आहे. पुन्हा तो मलिन होऊ देऊ नको. समजलास ना? तुझ्यासाठी काल रात्री प्रार्थना केली. पुन्हाही करीन.'

असे म्हणून साधूने त्याच्या पाठीवरून हात फिरविला. तो चोर ते दिवा-ताट परत देऊ लागला. 'नकोत ती. खरंच मी तुला दिली आहेत. जा आता. तुझं नाव काय?' साधूने विचारले.

'वालजी,' असे तो थरथरणारा चोर म्हणाला. साधू कामाला गेला. ताई घरात गेली. वालजीही कृतज्ञतेने ओथंबून निघून गेला.

❋ ❋ ❋

दुःखी : प्रकरण दुसरे

# अभागिनी व तिची लहान मुलगी

ते तीन तरुण होते. तिघे एकमेकांचे मित्र होते, ख्यालीखुशाली करणारे होते. प्रत्येकाचे एकेक प्रेमपात्र होते. परंतु हळुहळू त्या तिघांना त्या प्रेमपात्रांचा वीट आला. आपल्या पाठीमागे असणाऱ्या त्या तिघींचा त्याग करावयाचा असे त्यांनी ठरविले.

ते तिघे आपापल्या त्या दोन दिवसांच्या राण्या बरोबर घेऊन निघाले. ते एका सुंदर थंडगार हवेच्या ठिकाणी जाणार होते. त्यांच्या प्रियकरणींना आनंद झाला होता. आपल्यावर आपल्या प्रियकराचे किती प्रेम, असे प्रत्येकीला वाटत होते.

ते हवेचे ठिकाण फारच मनोहर होते. जिकडे तिकडे घनदाट छाया होती. जंगलातून मधूनमधून नागमोडी लाल रंगाचे रस्ते होते. कोठे उंच गगनभेदी शिखरे, तर कोठे पाताळास भिडू पाहाणाऱ्या दऱ्या. नाना रंगांची व गंधांची फुले जिकडे तिकडे दिसत. पक्ष्यांचे कर्णमधुर आवाज राईतून ऐकू येत.

ते तिघे तरुण व त्या तिघी तरुणी एका भव्य हॉटेलात उतरली. प्रत्येकाची स्वतंत्र खोली होती. सायंकाळी ती सारी फिरायला गेली. काही वेळ सर्व जण बरोबर होती. पुढे वाटा फुटल्या. एकेक जोडपे एकेक दिशेला गेले.

त्या गर्द छायेत ते पाहा एक जोडपे बसले आहे. प्रेमाशिवाय जणू जगात काही नाही, असे त्यांच्या मुद्रेवरून दिसत आहे.

'मला कधी कधी शंका येते. विचारू का?' ती म्हणाली.

'कोणती शंका!' त्याने विचारल.

'तुम्ही माझा एक दिवस त्याग कराल. तुम्ही मला सोडून जाल. का असं मनात येतं ते कोणास कळे! नाही ना मला टाकणार? नाही ना अंतर देणार?'

'ती पाहिलीस वेल? त्या झाडाला कशी घट्ट विळखा घालून बसली आहे. ती तुटेल, मोडेल, परंतु झाडाला आपण होऊन सोडणार नाही.'

'वेलीनं झाडाला घट्ट धरून ठेवलं आहे; परंतु झाडाचा काय नेम? तो वृक्ष दुसऱ्या वेलीही जवळ करतो. काही वेली गुदमरतात, काही हसतात. झाडाला काय त्याचं?'

'आपणा दोघांमध्ये कायमचं प्रेमाचं नातं जोडणारी लिली नाही का? लिली आपणांस एकमेकांपासून दूर होऊ देणार नाही.'

'लिलीला बरोबर आणलं नाही. घरीच ठेवून आले. आई, आई म्हणत असेल. आता दोन-तीन वर्षांची झाली. तीन वर्षं. तीन वर्षं आपण प्रेमात दवडली. अशीच सारी जातील का? असाच हा जन्म जाईल का, पुढील जन्म जातील का? तुम्ही मला तुमच्या राहात्या घरी केव्हा नेणार? विचारलं का वडिलांना? किती दिवस त्या वस्तीत मी राहू? सांगा ना.'

'नेईन. लवकरच नेईन. बाबांच्या कलानं घेतलं पाहिजे. त्या दिवशी माझ्यावर रागावले. नीट राहायचं असेल तर घरी राहा, नाही तर चालता हो. व्यापारात लक्ष घाल. उडाणटप्पूपणा किती दिवस चालायचा? सारी फुलपाखरं आता सोडून दे, वगैरे कितीतरी बोलले. हे बघ, बाबांनी घालवलं तर उद्या आपण कुठं जाणार? गरिबीत राहायची मला सवय नाही. जरा दमानं घे हो.'

'पैसे काय करायचे? आपण गरिबीतही राहू. मी मिलमध्ये कामाला जाईन. तुम्हाला कष्टाचं काम होणार नाही. तुम्ही घरी राहा; परंतु आता दूरदूर नको. खरंच नको.'

'बरं, विचार करू.'

असे त्यांचे बोलणे चालले होते. त्या दुसऱ्या जोडप्याचे काय चालले आहे बोलणे? प्रियकरांचे विश्रब्धापलाप ऐकू नयेत. त्यांची मोकळी मने त्या वेळेस बोलत असतात; परंतु आपण ऐकू या. आपणाला त्यांचा हेवा ना दावा. जगात कसे प्रकार असतात ते पाहायचे आहे.

'तुझं माझ्यावर प्रेम नाही. मी तुला इतके पैसे देतो, कधी कधी घोड्याच्या गाडीतून फिरवतो तरी तुझं प्रेम नाही. का बरं असं? माझ्या मनाला काय वाटत असेल? तुझा त्याग करावा असं मनात येतं; परंतु तो कृतघ्नपणा होईलं म्हणून भितो.'

'तुमचंही माझ्यावर कुठं आहे प्रेम? मलाच का एकटीला गाडीतून फिरवता? दुसऱ्या कुणी अवदसा नाही बसल्या तुमच्या गाडीत?'

'आपल्याच जातीच्या लोकांना शिव्या देणं वाईट.'

'आमची जात म्हणजे काय वाईट?'

'मग वेश्या होणं का चांगलं?'

'चांगलं नसेल तर लाळ घोटीत त्यांच्याकडे का जाता?'

'क्षणभर करमणूक.'

'आम्ही काय करमणुकीपुरत्या?'

'अग, थट्टा केली. अशी रागावू नकोस. आज तरी इथं तुला एकटीलाच आणलं की नाही? खरं प्रेम तुझ्यावरच.'

'अगदी गळ्याशपथ?'

'होय, शपथ.'

'खरंच. तुमच्याबरोबर बोलण्यात मला मजा वाटते. वेळ कसा पटकन जातो. तुम्ही माझ्याकडे आला नाहीत म्हणजे मी अधीर होते. हसता काय? खोटं नाही सांगत.'

'अगदी गळ्याशपथ?'

'हो गळ्याशपथ.'

असा दुसऱ्या जोडप्याचा संवाद चालला होता आणि तिसरे? तिसऱ्याचाही थोडा प्रकार पाहू या. बोलण्यावरून माणसाची परीक्षा होते. बोलण्याच्या स्वरावरून परीक्षा होते. त्या वेळच्या मुद्रेवरून परीक्षा होते.

'मला तुम्ही मोत्यांचा हार कधी देणार? देईन देईन म्हणता नि काही नाही. फसवी तुमची पुरुषांची जात!'

'आणि तुमची मोठी प्रामाणिक वाटतं? स्त्रियाच पुरुषांनाही जन्म देतात. स्त्रियाच फसव्या असतील म्हणून पुरुष फसवे होतात. स्त्रियांच्या ओठांवर साखर

असते; पोटांत विष असतं. बोलणं, हसणं गोड; परंतु मनांत डोकावून पाहिलं तर? रामराम! सारी घाण.'

'आपण या सुंदर ठिकाणी भांडायला का आलो? ही फुलं तुझ्या केसांत घालू?'

'काँही नको.'

'नको म्हणजे हवीत. बायकांचं उफराटं बोलणं, अहंभावी बोलणं.'

'किती घाणेरडी आहेत ती फुलं!'

'माझा हात लागून घाणेरडी झाली. तुझ्या केसांचा स्पर्श होऊन सुंदर होतील!'

'एक सुंदरसा बंगला कधी घेऊन देणार?'

'तुझं माझं लग्न लागेल तेव्हा.'

'अजून नाही का लागलं?'

'तसं देवाधर्मासमक्ष कुठं लागलं आहे?'

'देव सर्वत्र आहे ना? आपण एकत्र आलो त्या क्षणीच आपलं लग्न लागलं. ते देवानं पाहिलं. हृदयातील धर्मानं अभिनंदिलं. हसता काय?'

'परंतु मंत्र वगैरे कुणी म्हटले का? माझे बाबा वगैरे तिथे होते का?'

'मंत्र म्हणणं म्हणजे धर्म वाटतं? खरंच सांगा, तुमचं माझं लग्न विधिपूर्वक करायचं म्हटलं तर तुमचे वडील वगैरे येतील का?'

'जाऊ देत ही बोलणी. प्रेमात रमावं. जाईल दिवस तो आपला. पुढचं फार पाहू नये. आज आपण आनंदात आहोत ना?'

'आणि उद्या?'

'उद्याचं कोण सांगू शकेल? जगात नक्की असं काय आहे? सारं अस्थिर व चंचल. जाईल दिवस तो मजेत दवडावा. ऊठ. कोणी तरी येत आहे.

'माझा हात धरून उठवा.'

'मला नाही उठवत.'

'मी तर हलकं फूल आहे.'

'तुम्ही असता फुलाप्रमाणं, परंतु बसता मानेवर दगडाप्रमाणं.'

'तुमच्या गळ्याला का फास लावतो आम्ही?'

'फासही बरा. तो क्षणभर गुदमरवतो व मारतो तरी. जीव सुटतो; परंतु तुम्ही गळ्यात हात घातलेत की गुदमरवता; परंतु मारीत नाही. पुन्हा ते हात दूरही करता येत नाहीत. सुकुमार, परंतु जड, खरं ना ? बरं, ऊठ आता.'

त्याने हात धरून तिला उठविले. दोघे निघून गेली. झाडांची पाने सळसळ वाजत होती. काही फांद्या वाकून त्या जोडप्यांच्या कानगोष्टी ऐकत होत्या. त्या जंगलातील रस्त्यांवरील विद्युद्दीप चमकू लागले. किती सुंदर दिसत होते दृश्य ! हिरव्या हिरव्या झाडीत ते विजेचे दिवे; परंतु फिरायला जाणारे परतू लागले. एखादे वेळेस वाघाच्या डोळ्यांचीही बिजली दिसायची.

आमची तिन्ही जोडपी त्या हॉटेलात आली. भोजने झाली. तांबूलभक्षण झाले. गाणे झाले. गप्पा झाल्या. विनोद झाले. सारी झोपण्यासाठी आपापल्या जागी निघून गेली.

रात्र गेली. उजाडले आता; परंतु आमच्या त्या तीन युवती अद्याप उठल्या नव्हत्या. बाहेरही जरा थंडच होते. गुलाबी झोपेत त्या होत्या; परंतु गुलाबाचे काटे अजून कळायचे होते. बऱ्याच वेळाने आपापल्या खोल्यांत त्या तिघी जाग्या झाल्या, परंतु त्या तिघींचे प्रियकर नव्हते. ते कोठे गेले व केव्हा गेले ? येथे निजले तर होते. केव्हा उठून गेले ?

त्या तिघी सर्वत्र हिंडल्या, परंतु प्रियकरांचा पत्ता नाही. त्या आपापल्या खोल्यांत जाऊन बसल्या. बराच वेळ झाला तरीही कोणी आले नाही. शेवटी त्या तिघी एके ठिकाणी बसून नवीन विचार करू लागल्या.

पहिली : हे असे कसे गेले ? गोडगोड बोलून यांनी गळा असा कसा कापला ? माझ्या मनात संशय येई तो खरा झाला.

दुसरी : येथे आणून आपणास सोडून गेले असे दिसते.

तिसरी : तरीच मला म्हणाले, उद्याचे कोणी सांगावे ? जाईल दिवस तो आपला.

पहिली : मग आता काय करायचे ?

दुसरी : आपल्याला विचार करण्याची जरूरीच नाही. पिढीजात आपला धंदा असाच आहे. हा गेला तर तो. तो गेला तर आणखी कोणी. जगात पुरुष आहेत तोपर्यंत आपणास चिंता नाही.

तिसरी : बरे झाले मेला गेला तो. पैसे देई, पण अगदी घाणेरडा.

दुसरी : आपला हा काही पहिलाच अनुभव नाही.

पहिली : मला तरी हा पहिलाच अनुभव आहे. काय करावे, आता कोठे जावे ?

तिसरी : चला परत मुंबईला जाऊ. आपली दुकाने थाटू.

पहिली : मी दुकान थाटून बसू ? आयुष्याची, अब्रूची, सौंदर्याची, तारुण्याची का विक्री करू ? असे कसे मी करू ? माझं त्या तरुणावर प्रेम होते. मी त्याला देव मानले. मी मनाने त्याला सर्वस्व दिले. तो मला सोडून गेला तरी त्याची स्मृती माझ्याजवळ आहे. तो फसवणारा निघाला म्हणून का मीही त्याला फसवू ? मी कुठेही जाईन, मोलमजुरी करीन व त्याचे चिंतन करीत राहीन. प्रेम एकदाच देता येते. ते पुन्हा कसे कोणाला देता येईल ? ते कोठे आहे आता देण्यासाठी शिल्लक ? सारे त्याला दिले. माझ्या लिलीच्या जन्मदात्याला सारे दिले.

तिसरी : तुम्ही वेड्यासारखं काय बडबडता ? असली भाषा आपणासारख्यांच्या तोंडी शोभत नाही.

पहिली : आपण का माणसं नाही ?

दुसरी : आपण माणसांची करमणूक आहोत.

पहिली : मला तुमचं बोलणं समजत नाही.

दुसरी : हळुहळू समजेल.

त्या पुन्हा आपल्या खोल्यांत गेल्या. एक दिवस गेला. दोन गेले. त्यांच्या प्रियकरांचा पत्ता नाही. शेवटी हॉटेलवाल्याचे बिल देऊन त्या तिघी निघून गेल्या.

कोठे गेल्या निघून ? दोघींचे माहीत नाही. एकीचे माहीत आहे. त्या लिलीच्या आईचे माहीत आहे. ती मुंबईत जेथे राहात असे तेथे परत गेली. आता त्या शहरात तिला राम वाटेना. जवळचे सारे विकून थोडेसे पैसे जमवून ती लहान मुलीला घेऊन मुंबई सोडून निघाली.

लिलीचे पुढे कसे होईल, हीच एक त्या तरुण मातेला चिंता होती. ती लिलीकडे बघे व मनात म्हणे, 'लिली न जन्मती तर मी जीव दिला असता, परंतु लिलीसाठी जगले पाहिजे. लिलीचे लग्न होईपर्यंत, तिचा संसार सुरळीत सुरू होईपर्यंत तरी मला जगले पाहिजे; परंतु लिलीला कसे वाढवू ? कसे हिचे पालनपोषण करू ? घर ना दार. देहाचे दुकान मांडू ? छे, ती कल्पनाच असह्य

वाटते. मग काय करू? आणि लिली जवळ असेल तर कोठे कामधाम तरी कसे करता येईल? हिला कोणाजवळ ठेवायची?'

असे अनेक विचार त्या मातेला त्रस्त करीत होते. लिलीला कुशीत घेऊन ती रडे. रडता रडता झोपी जाई. असे करीत, हिंडत हिंडत ती एका गावाला आली. सायंकाळी पाच-सहा वाजण्याची वेळ असेल. ही दमलेली आई एका झाडाखाली पडली होती. जवळ तिचे बाळ झोपले होते. उशाशी एक पेटी होती.

त्या झाडाजवळ एक खाणावळ होती. त्या खाणावळवाल्याची मुले या झाडाजवळ खेळत होती. एकमेकांचे डोळे धरीत, लपत, कोणी कुणाला पकडी. पळापळ होई. एक खेळ संपे. दुसरा सुरू होई. भातुकली मांडीत. झाडाची पडलेली पाने ह्याच पत्रावळी. त्यांच्यावर काही तरी लुटुपुटीचे वाढायचे, सर्वांनी खायचे, लुटुपुटीच्या द्रोणातून लुटुपुटीची कढी भुरकायची. मग कोणी एखादा कागद आणी. त्याची कोणी होडी करी, कोणी पंखा करी, कोणी फाडून पीळ भरून झाड करी. मुलांच्या गंमती. आमची लिलीही हळूच उठून त्या मुलांत मिसळली. तीही हसू लागली. खेळू लागली. लुटुपुटीचे जेवू लागली. त्या मुलांना गंमत वाटली. त्यांनी तिला आपल्यात घेतले. लिली फार सुंदर दिसे.

'कशी आहे मुलगी?' त्यांच्यातील एक म्हणाली.

'साबुदाण्यासारखी.' दुसरी बोलली.

'दुधासारखी.' तिसरी बोलली.

चौथीला अद्याप उपमा सुचत नव्हत्या. खाणावळवाल्याला मुली बऱ्याच होत्या. मुलगा एकच होता.

लिलीची आई जागी झाली; परंतु जवळ मुलगी दिसेना. ती कावरीबावरी झाली. मुलगी कोणी घेऊन तर नाही गेले असे मनात येऊन ती दचकून उठली. तो समोर लिली दिसली. खेळण्यात दंग होती. त्या मुलामुलींशी एकरूप झाली होती. घाबरलेली माता कौतुकाने लिलीचा खेळ पाहू लागली.

'आता घरात या रे. पुरे खेळ. तिन्हीसांजा झाल्या.' खाणावळवाल्याची बायको दारातून म्हणाली. ती मुले खेळ आटोपून निघाली. त्यांच्याबरोबर लिलीही निघाली. ती मुले थांबली. ती विचार करू लागली. इतक्यात लिलीची आई तेथे आली व लिलीने तिला मिठी मारली.

'तुम्ही तिची आई वाटतं?' मोठ्या मुलीने विचारले.

'हो.'

'छान आहे तुमची मुलगी. आमच्यात तर इतकं सुंदर कोणी नाही. तुम्ही झाडाखाली राहाता? तुमचं इथंच घर?'

'हो. या झाडाखाली घर.'

'थंडी लागेल, पाऊस लागेल, परंतु उन्हाळ्यात बरं. नाही?'

'येता की नाही घरी?' ती आई दारातून पुन्हा म्हणाली. ती सारी मुले गेली. लिलीची आई लिलीला घेऊन झाडाखाली बसली. तिच्या मनात किती तरी विचार येत होते. शेवटी तिने त्या खाणावळवाल्या बाईकडे काही तरी विचारण्याचे ठरविले. ती तिच्याकडे गेली.

'कोण पाहिजे तुम्हाला? ते तर बाहेर गेले आहेत.' खाणावळवाली बाई म्हणाली.

'मला तुमच्याशीच आधी काही बोलायचं आहे.'

'काय बरं?'

'मी एक गरीब मुलगी आहे. तुम्ही जणू माझ्या आईसारख्या. मी संकटात आहे. मला कोणी आधार नाही. मी व ही माझी मुलगी दोनच आम्ही. या मुलीचं कसं पालन-पोषण करावं याची चिंता वाटते. मी काही मोलमजुरी करीन, तर हिला कुठं ठेवू? मघा माझी मुलगी तुमच्या मुलांच्या खेळात रंगून गेली. तुमच्या मुलांनीही तिला आपल्यात घेतलं. माझ्या मनात विचार आला की, माझ्या मुलीला तुमच्याकडेच ठेवावं, तुमची इतकी मुलं आहेत त्यांत ती वाढेल. तिच्यासाठी निराळं फार काही करायला नको. मी तिच्यासाठी दर महिना पाच रुपये पाठवत जाईन. दर साल एक वाढवीत जाईन. मध्येच जास्त कमी लागलं तरी पाठवीन. तुम्ही तिला वाढवा, शाळेत घाला, शिकवा. ती जसजशी वाढेल तसतशी मी रक्कमही वाढवीन. मुलीची जात. पोलकं, परकर सारं लागतं. ठेवाल का तुमच्याकडे? कराल का या मातेवर दया?' लिलीच्या आईने डोळ्यांत पाणी आणून विचारले.

'मी काय सांगणार? ते घरी आले म्हणजे त्यांना विचारीन व मग काय ते कळवीन. माझ्या मते ठेवायला हरकत नाही. इतकी मुलं आहेत त्यांत आणखी एक. भरल्या गाड्याला मुठीचं का ओझं होतं? पाहीन विचारून हो.'




लिलीला घेऊन तिची आई झाडाखाली बसली. आईच्या मांडीवर लिली होती. हसत होती. आकाशातील चांदोबाकडे झाडाच्या पानांतून ती पाहात होती. थोड्या वेळाने खाणावळीतून बोलावणे आले. लिलीला घेऊन तिची आई गेली.

'ऐकलं तुमचं म्हणणं. परंतु ७ रुपये हवेत. पुढच्या वर्षी ८. मग तिसऱ्या वर्षी १० चौथ्या वर्षी कळवीन. अहो, अनेक खर्च असतात. आजारीच पडली, काढाच ठेवा, सुंठ आणा, – एक का दोन, मुलांची शेकडो दुखणी. गोवर आहे, कांजिण्या आहेत, देवी आहेत. नाना प्रकार. पाच रुपयांत कसं व्हायचं? थंडीत गरम कापड हवं, उन्हाळ्यात मलमल हवी. हो, सारं नीट नको का

करायला? आणि सहा महिन्याचे पैसे आज आगाऊ आधी मुलीला ठेवताना. कारण तुम्हाला नोकरी कधी मिळेल त्याचा काय नेम? हल्ली सर्वत्र बेकारी. पाहा परवडत असेल तर. मी ठेवायला तयार आहे. सारं मनापासून करीन. तशी आमची ही प्रेमळ आहे. ठरवा तुमच्या मनात.' खाणावळवाला म्हणाला.

'काय ठरवू मी? सात तर सात; परंतु ठेवा. कुठं घेऊन जाऊ तिला मी? तुमचीच मुलगी माना.' लिलीची आई म्हणाली.

'परंतु सहा महिन्याचे पैसे?' त्याने विचारले.

'देत्ये ना ते.' ती म्हणाली.

'ठीक. ते झाडाखालचं सामान घेऊन इथं या. जाईपर्यंत इथंच राहा.' त्याने आस्थेने सांगितले.

'रात्रभर विसावा घेऊन मी उजाडताच जाईन. कुठं तरी कामधंदा पाहिला पाहिजे. इथं थांबून काय करू?' ती बोलली.

खाणावळवाल्याच्या एका खोलीत ती माता राहिली. तिने आपल्या मुलीला जणू शेवटचे पोटभर जेवू घातले. घोटभर कढत दूध पाजले. तिला कुशीत घेऊन ती पडली. तिला झोप येईना. मुलगी कुशीत झोपली होती. आईला अगदी चिकटून झोपली हाती.

पहाटेची वेळ झाली. ती माता उठली. मुलीला सोडून जाणे तिला भाग होते. लिली उठल्यावर ते शक्य नव्हते. तिला झोपेतच सोडून जाण्याशिवाय मार्ग नव्हता. त्या अभागिनीने मुलीचा शेवटचा मुका घेतला. पुनःपुन्हा ती लिलीकडे बघत होती. तिची तृप्ती होईना; परंतु ती उठली. त्या खाणावळवाल्याला व त्याच्या बायकोला ती म्हणाली, 'माझी मुलगी तुमच्या पदरात मी घालीत आहे. जपा तिला. तिला पोटच्या मुलाप्रमाणं वागवा. आईची तिला आठवण होऊ देऊ नका. तिच्या डोळ्यांतून पाणी नका येऊ देऊ. तिला काही कमी नका करू.'

ती दोघे म्हणाली, 'काळजी नका करू. आम्ही सारं नीट करू.'

ती माता निघून गेली. लिली झोपेत हसत होती.





दुःखी : प्रकरण तिसरे

# अघटित घटना



लिलीची आई हिंडत हिंडत एका शहरात आली. तेथे एक मोठा कारखाना होता. त्या कारखान्यात तिला नोकरी मिळाली. एका लहानशा खोलीत ती राहात असे. काटकसरीने वागत असे. आपल्या मुलीसाठी पैन् पै शिल्लक टाकीत असे.

या कारखान्याचा मालक फार उदार होता. त्याचा इतिहास मोठा विचित्र होता. तो या शहरात कधी, कोठून आला ते कोणास फारसे माहीत नव्हते. तो खूप श्रीमंत होता; परंतु त्याला मूलबाळ कोणी नव्हते. त्याला कोणीच नव्हते. तो एकटाच होता. एका मोठ्या बंगल्यात तो राहात असे. त्याने अनेक धर्मशाळा बांधल्या, अनेक सार्वजनिक विहिरी खणविल्या. त्याने मोफत दवाखाने घातले, अनाथालये उघडली. जिकडे तिकडे त्याची कीर्ती पसरली. सरकारी अधिकारी त्याला मान देत, जनता त्याच्यावर प्रेम करी.

तो त्या शहराच्या नगरपालिकेचा अध्यक्ष होता. नेहमी तो निवडून येई. निवडून येण्यासाठी त्याला खटपट करावी लागत नसे. सर्वांच्या हृदयात त्याला स्थान होते. अशा ह्या उदार पुरुषाच्या कारखान्यात लिलीची आई कामाला जाई. काही दिवस गेले; परंतु पुढे निराळीच परिस्थिती उत्पन्न झाली. त्या कारखान्यात दोन भाग होते. एका भागात सारे पुरुष कामगार होते. दुसऱ्या भागात साऱ्या बाया होत्या. बायांवर देखरेख करणाऱ्या बायाच होत्या.

बायकांचा स्वभाव मोठा जिज्ञासू असतो. त्यांना चौकश्या फार कराव्याशा वाटतात. ही नवीन आलेली बाई कुठली, कोण याची माहिती त्या काढू लागल्या; परंतु फार माहिती मिळेना.

'ती एकटी असते.' एक जण म्हणाली.

'नवरा वगैरे नाही वाटतं?' दुसरी म्हणाली.

'तिचं कोणीच नाही का कुठं?' तिसरीने विचारले.

'ती पोस्टात जाते व कोणाला तरी पैसे पाठवते.' चौथी म्हणाली.

'कोणाला पाठवते पैसे? काही तरी काळंबेरं आहे. चांगल्या चालचलणुकीची दिसत नाही ही बाई.' पाचवी म्हणाली.

बायांची अशी बोलणी एके दिवशी चालली होती. पोस्टात जाऊन बातमी काढण्याचे एकीने ठरविले. शेवटी त्यांना कळले की, एका मुलीला पैसे पाठविण्यात येतात. कोण ही मुलगी? ही का पैसे पाठवते? हिचीच असेल मुलगी? मग ही त्या मुलीला येथे का आणीत नाही? नवरा कोठे आहे? काही तरी भानगड आहे खास.

लिलीची आई कारखान्यात जाताच साऱ्या बाया तिच्याकडे बघत. कोणी नाके मुरडीत. कोणी फिदीफिदी हसत; परंतु ती शांतपणे काम करू लागे. होता होता या गोष्टींची फारच वाच्यता होऊ लागली. एके दिवशी मुख्य बाई लिलीच्या आईला म्हणाली, 'येत्या एक तारखेपासून तुम्हाला नोकरीवरून काढून टाकण्यात आलं आहे. वाईट चालीच्या बायका इथं नकोत.'

'परंतु मी वाईट चालीची नाही. वाईट चालीची असत्ये तर इथं भीक मागत आल्ये नसत्ये. दिवसभर राबत बसल्ये नसत्ये. मी सुंदर होत्ये. अजूनही सुंदर आहे.' ती म्हणाली.

'मला जास्त बोलायचं नाही. इथं शिस्त राहिली पाहिजे. साऱ्या बाया तुमच्या नावानं बोलतात. तुम्ही गेलेल्याच बऱ्या.' मुख्य अधिकारीण म्हणाली.

'माझ्या लिलीचं कसं होईल? मी तिला कोठून पाठवू पैसे? तिच्यासाठी हो सारं. मी एकटी असत्ये तर कधीच जगाला रामराम केला असता. नका मला घालवू.' ती म्हणाली.

'सांगितलं ना की, इथं पापी माणसं नकोत म्हणून? जा नीघ. का शिपायाकडून घालवू?' ती मुख्य बाई दरडावून म्हणाली.

लिलीची आई दुःखाने बाहेर पडली. 'आता कुठं पाहायचं काम? कारखान्याचा मालक उदार म्हणतात; हाच का त्याचा उदारपणा? मला काढून टाकलेलं त्याला का माहीत नसेल? त्याच्या परवानगीनं सारं होत असेल. का

काढलं त्यानं मला? कोणता माझा अपराध? काय केलं मी? अरेरे! आता कुठं जाऊ मी? कोण देईल मला काम?'

तिला कपडे शिवण्याचे काम मिळाले. एका दुकानदाराने तिला उक्त काम दिले. शंभर कपडे शिवून दिले तर अमुक इतके पैसे द्यावयाचे असे ठरले. लिलीची आई रात्रंदिवस शिवीत बसे! तिचे हात दुखून येत. सुईने शिवता शिवता हाताला भोके पडण्याची पाळी आली; परंतु ती शिवीत बसे. मुलीला पैसे नकोत का पाठवायला?

परंतु त्या दुकानदाराला दुसरा एक माणूस भेटला. तो आणखी कमी पैशात काम करून देणारा होता. लिलीच्या आईचे हे काम गेले. तिने त्या मालकाला पुष्कळ सांगून पाहिले; परंतु तो ऐकेना. तो म्हणाला, 'व्यवहार आहे. इथं दया करून कसं चालेल? माझं दिवाळं निघायचं. जो कमीत कमी पैशांत शिवून देईल, त्यालाच मी काम देईन.'

लिलीच्या आईला कोठे काम मिळेना. ती सर्वत्र भटकली; परंतु काम नाही. ती आता एकदाच जेवी. मुलीसाठी पैसे पुरले पाहिजेत. परंतु एक दिवस त्या खाणावळवाल्याचे, अधिक पैसे पाठवा, असे पत्र आले.

'तुमची मुलगी फार आजारी आहे. डॉक्टरचं बिल बरंच झालं आहे. तिला गरम कपडे करावे लागले. चहाकॉफी, फळं यांचाही बराच खर्च येतो. तरी या वेळेस तुम्ही पंचवीस रुपये तरी पाठवा.' असे ते पत्र होते. कोठून पाठवायचे पंचवीस रुपये? सारी शिल्लक संपली होती. दहा रुपये फक्त जवळ होते. काय करावे ते त्या मातेला समजेना. ती दुःखाने वेडी होऊन खोलीत बसली होती.

इतक्यात त्या घराचा मालक तेथे आला.

'काय पाहिजे?' तिने रडत रडत विचारले.

'तुमच्या दुःखाचं कारण विचारायला मी आलो आहे,' तो म्हणाला.

'पैसे, मला पैसे पाहिजेत. कोठून आणू? काम ना धाम, काय करू समजत नाही,' ती म्हणाली

'मी सुचवू एक उपाय?' त्याने भीतभीत विचारले.

'हं, सुचवा.' ती आशेने म्हणाली.

'रागावणार नाही ना?' त्याने प्रश्न केला.

'उलट आभार मानीन.' ती म्हणाली.

'हे पाहा, तुमचे केस फारच सुंदर आहेत. एका नाटक कंपनीला ते हवे आहेत. तुम्ही जर ते कापून द्याल तर तुम्हाला त्यांची योग्य ती किंमत ती कंपनी देईल. तुम्हाला वाईट का वाटत आहे? मी एक उपाय सुचविला.' तो म्हणाला.

'केस कापून देऊ?' तिने दुःखाने विचारले.

'दुसरा कोणता उपाय?' तो म्हणाला.

'बरं तर. देईन कापून. माझ्या लिलीसाठी मी मानही कापून देईन, मग केसांची काय कथा? आणि आज हे केस सुंदर आहेत. उद्या हे फिक्कट होतील. त्यांना उद्या कोण विचारणार आहे? आज सार्थकी लागत आहेत. माझ्या आजारी मुलीच्या कामी येत आहेत. उद्या सकाळी या. कापून ठेवीन हे केस.'

तो मालक गेला. लिलीची आई तेथे शून्य मनाने बसली होती. तिने आरशात पाहिले. ते केस किती सुंदर दिसत होते! तिच्या म्लान मुखाला अद्यापही ते शोभा देत होते. ते केस कापून टाकायचे? हो. मुलीच्या सुखासाठी तसे करणे भाग होते. तिने कात्री घेतली व ते लांब सडक सुंदर केस कापून टाकले. त्या केसांची गुंडाळी करून तिने ठेवली. दुसऱ्या दिवशी सकाळी मालकाजवळ ते केस तिने दिले. पंचवीस रुपये मिळाले. ते रुपये तिने मुलीला पाठवून दिले.

परंतु त्या खाणावळवाल्याला अधिक लोभ सुटला. लिलीच्या आईजवळ कितीही पैसे मागितले तरी ती देईल, असे त्या लोभी मनुष्यास वाटले. थोडे दिवस जातात न जातात, तो पुन्हा त्याचे पत्र आले. त्याने आणखी जादा पैशांची मागणी केली होती. लिलीची आई कोठून पाठविणार पैसे?

ती अभागिनी खोलीत सचिंत बसली होती. काय करावे तिला सुचेना इतक्यात मालक तेथे आला.

'तुम्ही पुन्हा का सचिंत?' त्याने प्रश्न केला.

'पुन्हा पैसे पाहिजेत,' ती म्हणाली.

'मी सुचवू एक उपाय?' त्याने विचारले.

'शरीर विकण्याचा का?' तिने दुःखाने प्रश्न केला.

'शरीर नाही,' तो म्हणाला.

'मग काय?' ती म्हणाली.

'हे पाहा, तुमचे दात फार सुंदर आहेत. ते द्याल का काढून? कसे मोत्यांसारखे आहेत. एका सिनेमा कंपनीला ते पाहिजे आहेत. तुम्हाला मोबदला मिळेल. योग्य ती किंमत मिळेल. पाहा विचार करून.' तो म्हणाला.

'माझं हसणं पाहून पूर्वी लोक मोहित होत असत. माझे हे शुभ्र दात जगाला दिसावेत म्हणून मी पूर्वी मुद्दाम हसत असे. ते दात काढून देऊ? काय हरकत आहे? आता कोणाला हसून दाखवायचं आहे? आता माझ्या साऱ्या जीवनाचंच हसू येतं आहे! देईन, माझे दात काढून देईन, परंतु एखादा डॉक्टर इथंच आणाल का? घरच्या घरीच काढून घ्या दात,' ती म्हणाली.

दुसऱ्या दिवशी डॉक्टर आले. लिलीच्या आईचे ते सुंदर दात एकामागून एक काढण्यात आले. ते दात विकण्यात आले. लिलीच्या आईला पैसे मिळाले. ते लिलीला पाठविण्यात आले; परंतु पुन्हा पैशांची मागणी आली तर! आता का डोळे काढून द्यावयाचे! लिलीची आई या विचारात असे.

लिलीची आई घरातून बाहेर पडत नसे. तिला लाज वाटे. तिचे सुंदर केस नष्ट झाले होते. तोंडाचे आता बोळके झाले होते. ती विद्रूप दिसे. लोक तिला हसत. पोरे तिच्या पाठीस लागत. कोणी दगड मारी, कोणी वेडावी. मग लिलीची आईही दुःखाने संतापे. तीही शिव्या देऊ लागे. तीही हातात दगड घेऊन मारू लागे. लोक म्हणत, हिला वेड लागले.

लिलीच्या आईला त्या कारखान्याच्या मालकाची फार चीड येई. त्या कारखान्यातून काढून टाकण्यात आले नसते तर अशी परिस्थिती येती ना. केस कापावे लागते ना. दात काढून टाकावे लागते ना. लोक म्हणतात, तो कारखानदार उदार आहे. तो गोरगरिबांच्या उपयोगी पडतो. कसला उदार नि कसचे काय? माझी तर अत्यंत वाईट दशा त्याने केली आहे. दुष्ट आहे मेला, असे लिलीची आई मनात म्हणे. त्या उदार महात्म्याची कोणी स्तुती करू लागला, तर लिलीची आई बोटे मोडीत कपाळाला आठ्या पाडी. पापी चांडाळ आहे मेला, असे म्हणे. ती स्तुती तिला सहन होत नसे.

एके दिवशी एक विशेष प्रकार घडला. तो उदार पुरुष फिरायला गेला होता. त्या बाजूच्या रस्त्याला मोठा उतार होता. एक गाडी त्या बाजूने येत होती. बैल वाटते नवीन होते. ते बैल उधळले. भडकले. ते गाडी भलतीकडे नेऊ लागले. अरे, तिकडे तर खळगा आहे. भयंकर खळगा. बैल खळग्यात टाकणार

का उडी! अरे, ते पाहा चाक! गेले. जवळ जवळ खाली चालले. फूट अर्धा फूट अंतर! जरा आणखी चाक बाजूला गेले की गाडी खळग्यात जाणार! काय करावे! चालले, - चाक चालले! एका क्षणाचा अवकाश!

परंतु इतक्यात तो आमचा उदार पुरुष रस्त्याच्या खालच्या बाजूला एकदम जाऊन उभा राहिला. डोळ्याचे पाते लवते न लवते तो तेथे उभा राहिला. ते चाक – खाली घसरणारे चाक त्याने आपल्या हाताने एकदम पलीकडे ढकलले! अरे बाप रे, केवढी ही शक्ती! जड गाडी, मालाने भरलेली! परंतु त्याने ते चाक ढकलले. चाक ढकलून तो पुन्हा एकदम वर आला. त्याने गाडी रोखून धरली. गाडी थांबली. तो गाडी आस्ते आस्ते नेऊ लागला. बैल त्याला वचकले. त्याची सिंहाची शक्ती पाहून ते बैल नरमले, थंड झाले. ते रीतसर चालू लागले.

चौकात प्रचंड गर्दी झाली. 'गाडी थांबविली. चाक उचललं. आपले प्राण धोक्यात घातले, केवढा महात्मा!' असे जो तो बोलू लागला. नगरपालिकेचा एवढा अध्यक्ष, किती तरी कारखान्यांचा मालक, उदारांचा राणा; परंतु किती साधा, किती त्यागी! त्याच्या नावाचा जयजयकार होऊ लागला.

इतक्यात ती लिलीची आई तेथे आली. तिला त्या महात्म्याची स्तुती सहन नाही झाली. ती धावत धावत त्याच्याकडे गेली. त्याच्या अंगावर ती थुंकली. 'दुष्ट, पापी, चांडाळ मेला. माझं सारं तू नुकसान केलंस. तू माझं वाटोळं केलंस,' अशा प्रकारे ती शिव्या देऊ लागली. तिने त्याला दगड मारले, लोक तिला ओढू लागले. इतक्यात पोलिसांनी तिला पकडले, तिला गिरफदार करण्यात आले. लिलीच्या आईचा पोलिसठाण्यावर खटला सुरू झाला. तिच्या दंडाला दोऱ्या बांधण्यात आल्या होत्या. पोलिस अंमलदार तेथे खुर्चीवर बसलेला होता. इतक्यात तो उदार पुरुष, तो म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष तेथे आला. पोलिसांनी त्याला खुर्ची दिली. तो पोलिस अंमलदार उभा राहिला, तो नवीनच आला होता.

'या बाईला शिक्षा देणार आहे. तुमच्या अंगावर ती थुंकली. तुम्हाला तिनं शिव्या दिल्या, दगड मारले,' तो पोलिस अंमलदार म्हणाला.

'तिला सोडून द्या असं सांगण्यासाठी मी आलो आहे. माझी काही तक्रार नाही. ती एक अनाथ स्त्री आहे. मी तिची चौकशी करून आलो आहे. गरिबीमुळं

ती वेडी झाली आहे. चुकीनं माझ्या कारखान्यातून ती काढली गेली. मीच तिचा अपराधी आहे. सोडा तिला. सोडा तिच्या दोऱ्या,' तो म्हणाला.

'माझ्या सांगण्यावरून तिला पकडण्यात आलं. तिला सोडण्यात येणार नाही.' तो अंमलदार म्हणाला.

'परंतु ज्याच्यासाठी पकडण्यात आलं त्याची तर तक्रार नाही. मी नगराचा अध्यक्ष आहे. मी सांगतो की, या स्त्रीला सोडा. माझं म्हणणं ऐका.' तो नगराध्यक्ष रागाने म्हणाला.

'नाही सोडलं तर काय कराल ?' अंमलदाराने तीव्र दृष्टीने बघत प्रश्न केला.

'जे करता येईल ते करीन. माझीही काही शक्ती आहे,' तो उदारात्मा म्हणाला.

'सोडा त्या स्त्रीला !' अंमलदार म्हणाला.

पोलिसांनी तिला मुक्त केले. ती त्या नगराध्यक्षाच्या पाया पडू लागली. ती म्हणाली, 'खरंच का तुम्ही उदार आहात ? तुम्ही मला सोडविलंत ! मी तुम्हाला दुष्ट समजत होते. तुमच्या कारखान्यातून मला काढून टाकण्यात आलं. माझ्या मुलीला मी पैसे पाठवते. मुलगी असणं म्हणजे का पाप ? हे पुरुष पापी असतात, स्त्रियांची ते फसवणूक करतात, विटंबना करतात. मी पापी नाही. माझ्या मुलीसाठी मी जगत्ये. माझी नोकरी गेली. मुलीला पैसे कसे पाठवू ? माझे केस कापून मी विकले. माझे दात विकले. माझं सारं सौंदर्य ! ते गेलं माझ्या मुलीसाठी. का माझी नोकरी दवडलीत ? का ?'

'मला माहीत नव्हतं. परभारे तुम्हाला काढून टाकण्यात आलं. पुन्हा देईन नोकरी,' तो म्हणाला.

'माझा हात धरा. ताप भरला हो मला. धरा ना ? धरा. अनाथाला आधार द्या. छे: ! अंधारी येते डोळ्यांसमोर, धरा हात, नाही तर मी पडेन,' ती म्हणाली.

त्याने एक गाडी बोलावून घेतली. त्या तापाने फणफणणाऱ्या स्त्रीला गाडीत घालून तो गेला. वाटेत तिने स्वतःची कहाणी सांगितली. एका हॉस्पिटलमध्ये तिला घेऊन तो गेला. ते हॉस्पिटल त्याच्याच देणगीतून सुरू झालेले होते. तो महात्मा तेथे येताच दवाखान्यातील सारे डॉक्टर, साऱ्या बाया, सारे नोकरचाकर आदराने उभे राहिले. सर्वांनी त्याला वंदन केले.

'या भगिनीची नीट व्यवस्था लावा,' तो म्हणाला.

एका खाटेवर त्या भगिनीला निजविण्यात आले. सारी व्यवस्था लागली.

आता इथं व्यवस्था होईल, शांत पडून राहा,' तो उदार पुरुष तिला म्हणाला.

'माझी एक तुम्हाला प्रार्थना आहे,' ती म्हणाली.

'कोणती?' त्याने विचारले.

'माझ्या मुलीला तुम्ही घेऊन या. तिला इथं आणा,' ती डोळ्यांत पाणी आणून म्हणाली.

'परंतु मला कशी देणार? तुमच्या सहीचं पत्र हवं,' तो म्हणाला.

'द्या कागद व शाई; मी देत्ये पत्र लिहून,' तिने सांगितले.

ती तापाने फणफणत होती. तरी तिने त्या खाणावळवाल्याला पत्र लिहिलं. त्या पत्रात 'ही चिठ्ठी घेऊन येणाऱ्यांबरोबर मुलीला पाठवावं;' असे लिहिले. त्या उदार पुरुषाने चिठ्ठी खिशात घातली.

'बरं मी जातो. तुमची मुलगी तुम्हाला भेटवीन,' तो म्हणाला.

'देव तुमचं कल्याण करो!' ती अंथरुणावर पडून म्हणाली.

तो उदार पुरुष घरी गेला. तो नगरपालिकेचा अध्यक्ष होता. बराच वेळ तो घरी काम करीत होता. रात्रीही लिहीत बसला होता. बऱ्याच उशीरा तो झोपला, सकाळीही जरा उशिराने उठला.

सकाळचे विधी संपवून तो आपल्या खोलीत वर्तमानपत्रे चाळीत बसला. एका वर्तमानपत्रातील मजकुराने त्याचे लक्ष वेधून घेतले. मोठ्या अक्षरांत ती बातमी होती –

'अपूर्व खटला. कित्येक वर्षांपूर्वी एक चोर पळून गेला होता. पोलिसांनी एका माणसाला पकडले आहे; परंतु तो माणूस म्हणतो, 'मी तो चोर नव्हे. मी कधीही तुरुंगात नव्हतो.' पोलिस म्हणतात, 'तूच तो.' त्या खटल्याचा आता निकाल लागायचा आहे. पाहावे काय होते ते.'

अशा अर्थाचा तो वृत्तान्त होता. उदार पुरुषाने तो पुन्हापुन्हा वाचला. त्याने ते वर्तमानपत्र खाली ठेवले. त्याची चर्या गंभीर झाली; परंतु त्याने झटपट काही तरी निश्चय केला. त्याने नोकराला बोलाविले. तो आला.

'काय रे, रायगावला चपळ घोड्यावरून जायला किती वेळ लागेल?'

'चार तास तरी लागतील.' नोकर म्हणाला.

'आपल्या घोड्यांतील सर्वांत चपळ असा घोडा तयार ठेव. मी काम आटोपतो. त्या गावी मला जायचं आहे.'

'ठेवतो तयार घोडा.'

नोकर निघून गेला. त्या उदार पुरुषाने भराभर कामाचे कागद वाचले. अनेक कागदांवर सह्या केल्या. मधून मधून तो घड्याळाकडे पाहात होता. दहा वाजायला आले. तो उठला. त्याने भराभर जेवण केले आणि घोड्यावर स्वार होऊन तो निघाला. लोक आश्चर्याने पाहात होते.

त्याने भरधाव घोडा सोडला. घोडा घामाघूम झाला व तोही घामाघूम झाला. धुळीने तोंड माखले. शेवटी एकदाचे ते गाव दिसू लागले. त्या गावात तो शिरला. कोणत्या बाजूला कोर्ट आहे?

'काय हो, कोर्ट कोणत्या बाजूला?' त्याने एकाला विचारले.

'असं सरळ जा व उजव्या बाजूला वळा. तिथं दिसेल गर्दी. आज एक गमतीचा खटला आहे, तो ऐकायला सारे लोक गेले आहेत,' तो मनुष्य म्हणाला.

निघाला घोडा. उजव्या बाजूकडे वळला. तो तुफान गर्दी. आपला हा उदार पुरुष घोड्यावरून खाली उतरला. एका झाडाला त्याने घोडा बांधला. त्याने आपले तोंड वगैरे पुसले. दुसरा अंगरखा त्याने घातला. तो कोर्टात जाऊ लागला. त्याची भव्य व उदार मूर्ती पाहून लोक आपोआप त्याला जायला जागा देत. तो त्या मुख्य सभास्थानी आला. न्यायाधीश उच्चासनावर बसले होते. हा उदार पुरुष आत शिरताच सर्वांचे लक्ष त्याच्याकडे गेले. सारे उभे राहिले; परंतु अंधारात प्रकाश आला, सूर्य आला. न्यायाधिशाने या पुरुषाला ओळखले.

'या. येथे या. माझ्याजवळ बसा. आज आमचं भाग्य!' असे न्यायाधीश विनयाने म्हणाले.

न्यायाधिशाजवळ एक सुंदर खुर्ची ठेवण्यात आली. तीत हा पुरुष बसला. न्यायाधीशही बसले. खटला सुरू झाला.

'महाराज, तो पळून गेलेला कैदी मी नव्हे. त्या तुरुंगाचं नावही मी कधी ऐकलं नाही. माझ्या वयाला आता पन्नास वर्षं झाली. कधी कोणाचं वाकडं केलं नाही. बारा वर्षांपूर्वी म्हणे पळून गेलेला कैदी! तो का मी? म्हणे तसाच उंच आहे. तसाच जाडजूड. हा का पुरावा? उंच असणं व जाडजूड असणं हा का गुन्हा? महाराज, मी निरपराधी आहे. मला हे काही माहीत नाही. कोर्ट- कचेरीची कधी पायरी मी चढलो नाही. जाऊ दे मला घरी. माझी मुलंबाळं वाट पाहात असतील,' तो आरोपी म्हणाला.

'अरे, त्या तुरुंगातील पोलिस आले आहेत. ते तुला ओळखतात. ते पोलिस का खोटे? त्या तुरुंगातील हे कैदीही साक्षीदार म्हणून आले आहेत. ते म्हणतात की हा आमच्याबरोबर होता. आम्ही एकत्र चक्की ओढली. फत्तर फोडले. हे कैदीही का खोटे? तुझ्याविरुद्ध भरपूर पुरावा आहे. माझा नाइलाज आहे. तू तुरुंगातून पळून आलास. पूर्वीच्या शिक्षेच्या दुप्पट शिक्षा तुला दिली पाहिजे!' न्यायाधीश म्हणाले

'कोणती पूर्वीची शिक्षा?' आरोपीने विचारले.

'अरे, तू बारा वर्षांपूर्वी तुरुंगात होतास, त्या वेळची. इतकं विसरून गेलास का? चांगलीच बतावणी करतोस तू!' न्यायाधीश हसून म्हणाले.

'मी नव्हतो हो तुरुंगात. का माझ्यावर कुभांड रचता? बालंट घेता? जगात न्यायच नाही का? हे माझे पांढरे होणारे केस का खोटं बोलतील?' आरोपी म्हणाला.

'पुरे कर वटवट. तुझ्यावर आरोप सिद्ध झाला आहे. आता मी निकाल सांगतो,' न्यायाधिशांनी कठोर आवाजात बजावले.

काय होणार निकाल? लोक अधीर होते ऐकायला; परंतु इतक्यात चमत्कार झाला. तो आलेला उदार पुरुष न्यायाधिशांच्या कानात काही बोलला.

'हे थोर गृहस्थ आले आहेत. या खटल्यावर ते काही प्रकाश पाडू पाहतात. त्यासाठी ते मुद्दाम दौडत आले. सत्यासाठी किती ही तळमळ. त्यांचं म्हणणं ऐकू या,' असे न्यायाधिशांनी सांगितले.

उदार पुरुष उभा राहिला. सर्वांनी त्याला प्रणाम केला. तो बोलू लागला, 'न्यायाधीशमहाराज, इतर सर्व अधिकारी, आरोपी व फिर्यादी आणि इतर बंधूंनो, वर्तमानपत्रात या खटल्याची हकीगत मी वाचली. ती वाचून मी चकित झालो. सत्यासाठी येथे धावत आलो. एका निरपराधी माणसास वर्षांनुवर्ष तुरुंगाच्या नरकात खितपत पडावं लागू नये म्हणून मी आलो. पोलिसांचा धंदा मोठा चमत्कारिक असतो. एखाद्या गोष्टीचा जर त्यांना तपास लावता आला नाही तर त्यांना आपली अब्रू गेली असं वाटतं. आपली अब्रू सांभाळण्यासाठी, आपलं कौशल्य व शिताफी दाखविण्यासाठी दुसऱ्याची अब्रू घ्यायला ते मागंपुढं पाहात नाहीत. ते वाटेल तो पुरावा तयार करतात. नवी सृष्टी उभारतात आणि सरकारही पुष्कळ वेळा पोलिसांच्या बाजूला उभं राहातं.



'या प्रस्तुतच्या खटल्यात आरोपी म्हणून जो मनुष्य उभा करण्यात आला आहे तो संपूर्णपणे निर्दोषी आहे आणि तुम्हाला आरोपी पाहिजे असेल तर तो मी आहे. तुरुंगातील पोलिसांनो, माझ्याकडे पाहा. नीट पाहा. म्हणजे तुम्ही मला ओळखाल. जे कैदी साक्षीदार म्हणून आणण्यात आले आहेत त्यांना मी ओळखतो. त्यांनी व मी एकत्र होऊन एकदा या पोलिसांना बेदम मारलं होतं. यासाठी मला फटक्यांची शिक्षा झाली होती. माझ्या अंगावर ते वळ अजून दिसतील. तुरुंगातील भट्टीजवळ काम करताना एकदा मी भाजलो होतो ते डाग माझ्या पाठीवर आहेत. तुम्हाला बघायचे आहेत? थांबा. मी अंगरखा काढतो. हं, हे पाहा ते डाग. आहेत ना? थांबा. अंगात घालू दे हं. आलं

लक्षात ? या पोलिसांनी, माझ्यासारखा दिसला एक तगडा माणूस, केला त्याला उभा. हा चावटपणा आहे. पोलिसांना याची लाज वाटली पाहिजे. चोर सोडून संन्याशाला सुळी देण्यात पुरुषार्थ नाही.

'आज बारा वर्षं मी जवळच्या शहरात वावरतो आहे. तेथल्या नगरपालिकेचा मी अध्यक्ष आहे. मी कारखाने उभारले आहेत. दवाखाने घातले आहेत. मंदिरं बांधली आहेत. पोलिसांना का मी दिसत नव्हतो का त्यांना ओळखता आलं नाही ? मी का लपूनछपून होतो ? राजरोस वावरतो आहे. सभांतून बोलतो आहे. मानपत्रं घेतो आहे. पोलिसांच्या अकलेचं दिवाळं निघालं आहे.'

'आरोपी मी आहे. मी पळून गेलो होतो. तुरुंगात एखादा कैदी गेला की, तो कायमचा कैदी होतो. मी प्रथम का गेलो तुरुंगात ? कोणता केला गुन्हा ? माझ्या घरी भावंडांना खायला नव्हतं. आम्ही बेकार होतो. उद्योगधंदा मिळेना. काम करायला तयार असून काम नाही. उपाशी बहीणभावंडं माझ्यानं बघवतना. मी रस्त्यातून चाललो होतो. एका हॉटेलात पाव दिसले. चोरले दोन पाव. पळत पळत घरी गेलो व माझ्या भावंडांना दिले; परंतु मला पकडण्यात आलं. दोन पावांसाठी मला पाच वर्षांची सजा झाली. घरी भावंडांचं काय होईल हा विचार सारखा मनात येई. पाच वर्षं तुरुंगात राहायचं ? मी पळून गेलो; परंतु लगेच मला पकडण्यात आलं. पाच वर्षांची सजा बारा वर्षं झाली. पुन्हा मी पळून गेलो. दुसऱ्या बाजूला गेलो. तेथे भटक्या व उडाणटप्पू म्हणून खटला भरण्यात येऊन पुन्हा माझी तुरुंगात पाठवणी केली गेली. तेथून सुटलो. परंतु कोणी आधार देईना. एका साधूनं आधार दिला; परंतु त्याच्याकडचं चांदीचं ताट मी चोरलं. का चोरलं ? त्या भांडवलावर काही धंदा करीन, प्रामाणिकपणं वावरेन. कारण चोराला कोण देणार भांडवल ? एकदा चोर ठरला की पोलिस नेहमी त्याच्यावर आळ घेतात. त्याची समाजात प्रतिष्ठा नसते. जो तो त्याच्याकडे साशंकतेनं पाहातो. म्हणून ते ताट मी चोरलं. पुन्हा पोलिसांनी मला त्याच रात्री पकडलं. त्यांनी मारीत मारीत मला साधूकडे नेलं. साधू थोर मनानं म्हणाला, 'ते ताट त्यानं चोरलं नाही, मीच ते त्याला दिलं आहे.' पोलिसांना मी तसंच सांगितलं होतं. पोलिसांचा उपाय चालेना. मला सोडून ते गेले. तो साधुपुरुष मला म्हणाला, 'जा, पुन्हा आत्मा मळवू नकोस.' ते ताट हे माझं भांडवल. त्या भांडवलावर मी उद्योग आरंभिला. हळुहळू माझी भरभराट झाली.

ज्या शहरात मी हल्ली राहातो तिथं आलो. तिथं कारखाना घातला. बेकारांना काम मिळावं म्हणून उद्योग आरंभिले. चोरी करणारा चोर नसतो. समाजरचना रद्दी आहे, त्यामुळं चोऱ्या होतात. मनुष्याला वाईट करायला कोणी लावीत असेल तर तो समाज होय. मी त्या स्थितीतून गेलो होतो. म्युनिसिपालिटीतर्फे परिश्रमालये मी उघडली आहेत. बेकारानं तेथे यावं, काम करावं. अनाथांसाठी मी दवाखाने घातले आहेत. सार्वजनिक बागा उभारल्या आहेत.'

'परंतु आता काय! आज पुन्हा मी पळून गेलेला चोर म्हणून जगासमोर उभा राहात आहे. पुन्हा मला पोलिस पकडतील. माझं सारं कर्तृत्व विसरतील. त्या कर्तृत्वाचा मला अभिमान नाही. त्या साधू पुरुषाचा तो आशीर्वाद आहे. ज्यांना चोर चोर म्हणून तुम्ही वर्षानुवर्षे डांबून ठेवता त्या चोरांच्या अंगात केवढं कर्तृत्व असतं हे माझ्या उदाहरणावरून पाहा. चोरांस आदरानं वागवा. समाजात त्यांच्या कर्तृत्वाला वाव मिळेल असं करा, म्हणजे चोऱ्या होणार नाहीत.'

'त्या निरपराधी माणसाला सोडा. माझ्यासाठी त्याला त्रास झाला. मी त्याच्याजवळ क्षमा मागतो.'

असे म्हणून तो उदार पुरुष जायला निघाला. सारे तटस्थ होते. सर्वांनी त्याला रस्ता दिला. त्याच्या त्या माहात्म्याने सर्वांस दिपविले. थोर कृत्याचा जादूसारखा परिणाम होतो. एक तेजस्वी किरण येतो व सारा अंधार प्रकाशमय होतो. त्या उदार पुरुषाला पकडावयाला कोणी पुढे झाला नाही. जो तो एका उच्च वातावरणात गेला. घोड्यावर बसून तो महात्मा निघून गेला. नंतर काही वेळाने सारे भानावर आले.

'तुमचा खटला खोटा ठरला!' न्यायाधीश म्हणाले.

'चूक झाली महाराज. हा मनुष्य वालजी नव्हे. पळून गेलेला वालजी आता बोलत होता तो. या माणसावरचा खटला आम्ही काढून घेतो,' पोलिस अधिकारी म्हणाला.

'यापुढं जपा. वास्तविक तुम्हाला शिक्षा केली पाहिजे असे खोटे खटले भरण्याबद्दल. जा.' न्यायाधीश म्हणाले.

तो निरपराधी मनुष्य मुक्त झाला. त्या उदार पुरुषाला धन्यवाद देत तो निघून गेला.

* * *



दुःखी : प्रकरण चौथे

# अटक



त्या उदार पुरुषाचे मूळचे नाव वालजी. वालजी घोड्यावर स्वार होऊन परत आपल्या शहरी आला. पोलिस लवकरच आपणास पकडणार ही त्याला खात्रीच होती. सायंकाळ होऊन गेली होती. त्याने आवराआवर केली. उरलेसुरले काम आटोपले. त्याने अंगात एक विशेष जाकीट घातले, त्यावरून आणखी एक अंगरखा घातला. त्यावरून आणखी एक जाड लांब कोट घातला. त्याला दवाखान्यात जाऊन त्या अभागिनीची भेट घ्यायची इच्छा होती. तिची मुलगी आणण्याचे त्याने कबूल केले होते; परंतु अकस्मात हा खटला आला. त्या मुलीकडे जाण्याचे राहिले आणि आता तर ते शक्य नव्हते; परंतु त्या आईला भेटता आले तर पाहावे असे वालजीला सारखे वाटत होते.

त्या अभागिनीचा ज्या पोलिस अधिकाऱ्यासमोर त्या दिवशी तो खटला चालला होता, त्या पोलिस अधिकाऱ्याने त्याच वेळेस वालजीला ओळखले होते. घसरणाऱ्या मालाच्या गाडीला एका खांद्याने वर उचलणारा असा शक्तिमान दुसरा कोण असणार ? वालजीच्या शक्तीच्या कथा पोलिसांत पसरलेल्या होत्या. त्याचे फोटोही होते. त्याच वेळेस त्या पोलिस अधिकाऱ्याने वालजीस पकडले नाही. वालजी नगराध्यक्ष होता. तो उदार म्हणून प्रसिद्ध होता. सारे लोक त्याला देवाप्रमाणे मानीत. त्याला एकदम अटक करण्याने दंगा झाला असता.

त्या पोलिस अधिकाऱ्याने अधिक पोलिस मागवून घेतले आणि आता तर हा वालजी ही शंकाच नव्हती. ते दुसरे पोलिसही इकडे आले. वालजीच्या

शहरात आज जिकडे तिकडे पोलिस होते. चव्हाट्याचव्हाट्यावर, नाक्यानाक्यावर पोलिस खडे होते.

रात्र झाली. दवाखान्यात कसे जावयाचे? सर्वत्र पोलिस होते. वालजीच्या घराजवळ एक संन्यासिनी राहात असे. वालजीची तिच्यावर भक्ती होती. तो रोज तिच्याकडे जावयाचा व तिला वंदन करून तिचा आशीर्वाद घेऊन यावयाचा. तो लपत छपत तिच्याकडे गेला.

'माईजी, मला तुमच्याकडे थोडा वेळ लपू दे,' तो म्हणाला.

'त्या खाटेखाली राहा,' ती म्हणाली.

'कोणी चौकशीसाठी आले तर मी इथं नाही असं सांगा,' त्याने विनविले.

आता रात्र बरीच झाली. वालजीच्या घराला गराडा पडला. सर्वत्र पोलिस उभे होते. तो पोलिस अधिकारी वर गेला; परंतु वालजी नाही! कोठे गेला वालजी? त्याने का पुन्हा हातावर तुरी दिल्या? आज बारा वर्षे त्याने पोलिसांना गुंगारा दिला होता. आपण प्रथम वर कळविले, हा नगराध्यक्ष वालजी आहे. नंतर कोर्टात ती गोष्ट जाहीर झाली. आपल्या हुशारीबद्दल आपणास बढती मिळेल असे त्या नव्या पोलिस अधिकाऱ्यास वाटत होते; परंतु आता तर फजितीची वेळ आली.

शहरभर तपास सुरू झाला; परंतु वालजीचा पत्ता नाही.

'त्या संन्यासिनीकडे ते जातात. तिच्यावर त्यांची भक्ती आहे,' कोणी तरी माहिती दिली.

'बस. तिथंच असेल तो,' पोलिस अधिकारी आनंदाने म्हणाला.

पोलिस अधिकारी त्या संन्यासिनीच्या घरी आला. संन्यासिनी तेथे ध्यानस्थ बसली होती. दारावर टक्‌टक् आवाज झाला. संन्यासिनीने उठून दार उघडले.

'काय पाहिजे?' तिने प्रश्न केला.

'इथं नगराध्यक्ष आहेत का? ते तुमच्याकडे आहेत असं कळलं.'

'आहेत; नाहीत. नाहीत ते इथं.'

'प्रथम एकदम आहेत म्हटलंत?'

'ते चुकून आलं तोंडात.'

'मग नाहीत ना ते इथं?'

'नाहीत.'

'संन्यासिनीच्या शब्दांवर मी विश्वास ठेवतो. मी जातो. झडती घेत नाही. प्रणाम!' असे म्हणून तो पोलिस अधिकारी गेला.

काही वेळ गेला. वालजी खाटेखालून बाहेर पडला. त्याने संन्यासिनीचे आभार मानले.

'साऱ्या जन्मात आज खोटं बोलल्ये,' ती म्हणाली.

'देव रागावणार नाही,' तो म्हणाला.

वालजी हळूच बाहेर पडला. तो बोळातून, अंधारातून, लपत छपत, सावधानपणे जात होता. पोलिसांचा सुळसुळाट जरा कमी होता. पोलिसांनी गावबाहेर जाणारे रस्ते रोखून धरले; वालजी दवाखान्यात आला. रात्रीचे बारा वाजून गेले असतील. मध्यरात्री नगराध्यक्ष आले हे पाहून दाया, नोकर-चाकर चपापले.

'ती स्त्री कशी आहे?' त्याने विचारले.

'तिची आशा नाही. 'माझी मुलगी. माझी मुलगी' एवढंच ती म्हणते. घटका-दोन घटकांची ती सोबतीण आहे.' मुख्य दाई म्हणाली.

'कुठं आहे ती?'

'या बाजूला.'

वालजी लिलीच्या आईजवळ गेला. तो तिच्याजवळ बसला. तिने डोळे उघडून त्याच्याकडे पाहिले.

'लिलीला आणलंत? कुठं आहे ती?' तिने क्षीण स्वरात विचारले.

'मला जायला झालं नाही. आणीन हो तिला.' तो म्हणाला.

'आणीऽन! आणलं नाहीत ना? आता का मी जगणार आहे ती येईपर्यंत? जाऊ दे. देव आहे तिला. लिल्ये, देव हो तुला —' असे म्हणून तिने निराशेने हात आपटले. तिने लगेच डोळे फिरवले. लिलीला पाहाण्यासाठी डोळे उघडे होते. आता ते मिटत चालले. नाडी सुटत चालली. शेवटची लक्षणे दिसू लागली. लिलीच्या आईने राम म्हटला.

वालजी सद्गदित झाला. तो म्हणाला, 'लिलीच्या आई, तुमच्या मुलीचा मी सांभाळ करीन. तुम्ही सुखानं स्वर्गात जा. तुमच्या आत्म्याला शांती मिळो! मी शक्य ते लिलीसाठी करीन. तिच्या सुखासाठी प्राणही फेकीन.'

त्याला तेथे थांबण्याची आता आवश्यकता नव्हती. त्या अभागिनीच्या प्रेताच्या व्यवस्थेसाठी त्याने पैसे दिले. तो निघाला तेथून. कोठे गेला तो? तो पोलिसचौकीवर गेला. सारे स्तब्ध राहिले.

'मला ना पकडायचं आहे? हा मी आलो आहे. पकडा मला!' तो म्हणाला. पोलिस अधिकारी तेथे आला. वालजीला पकडण्यात आले. जड शृंखला त्याच्या हातापायांत घालण्यात आल्या. उदारांचा राणा, अनाथांचा आधार पुन्हा एक चोर झाला.





दु:खी : प्रकरण पाचवे

# समुद्रात



ते पाहा, एक मोठे गलबत बंदरात उभे आहे. ते गलबत कैद्यांनी भरलेले आहे. दु:खी कष्टी कैदी. त्यांच्या पायांत वजनदार साखळदंड अडकवलेले आहेत. त्यांच्या आजूबाजूस हत्यारबंद पोलिस आहेत. तो पाहा आपला वालजी! त्या सर्व कैद्यांत तो उठून दिसत आहे. त्याच्या तोंडावर एक प्रकारची दिव्यता आहे. धीरोदात्त वीराप्रमाणे तो दिसत आहे.

गलबताच्या डोलकाठीवर एक खलाशी चढला होता. त्या डोलकाठीला लांब जाडया दोऱ्या बांधलेल्या होत्या. तो खलाशी त्या दोऱ्यांवर चढून त्या आवळीत होता की काय? परंतु हे काय झाले? तो दोरीला लटकत राहिला. आता? कोण वाचवणार त्याला? हात सुटले तर समुद्रात पडेल तो, परंतु असा लोंबकळत तो किती वेळ राहणार? एकेक क्षण मोलाचा जात होता. सारे पाहात राहिले.

'त्या वालजीच्या पायांतील शृंखला काढा. त्याला मोकळं करा. तो या डोलकाठीवर चढेल. तो आपला पाय लांबवील. त्या पायाला खलाशानं आपले पाय अडकवावे. वालजी एका पायानं त्याचा सारा भार सहन करील. खलाशानं मग हात सोडावे इकडच्या डोलकाठीला धरावं,' असे कोणी तरी सांगितले. त्याप्रमाणे करण्यात आले. वालजी झपझप वर चढला. त्याने आपला मजबूत पाय लांबविला. त्या लोंबकळणाऱ्या खलाशाने आपले पाय त्याच्या पायांत अडकवले व त्याने हात सोडले. त्याचा सारा झोल वालजीने सहन केला. वालजीचा पाय वाकला नाही. जणू सिंगलबारच्या दांडीप्रमाणे त्याची ती तंगडी होती. खलाशाला वालजीने डोलकाठीकडे आणले. खलाशाने हाताने डोलकाठी पकडली व वरच्या पायांनी डोलकाठीला धरले. मल्लखांब सुरू झाला. तो सुर्रकन् खाली आला. सर्वांनी टाळ्या वाजविल्या. शाबास वालजी, असा जयजयकार झाला.

परंतु अरेरे! हे काय? वालजी पाण्यात पडला! अथांग समुद्रात पडला. आता काय करणार? त्याने दुसऱ्यास वाचविले, परंतु त्याला कोण वाचवणार? समुद्र खवळला होता. प्रचंड लाटा उसळत होत्या. कोठे आहे वालजी? तो दिसतही नाही. त्या लाटांनी का त्याला गिळंकृत केले? पाहा कशा लाटा नाचताहेत, हलताहेत! पाहा ते त्यांचे जबडे. पाहा ते लाटांचे विकट हास्य. त्या लाटांमध्ये एकदम भयंकर खळगा पडतो. जणू पाताळाचे दर्शन. पुन्हा त्या वर उसळतात; परंतु वालजी कोठे आहे?

ते का वालजीचे डोके? आला वाटते वर? छे! गेला खाली. घेतला समुद्राने बळी. त्या लाटा आनंदाने उसळताहेत. हसताहेत. लाटांची धिंगामस्ती सुरू आहे. त्यांचा भीषण खेळ; परंतु दुसऱ्याच्या प्राणाचा नाश.

गेला वालजी गेला. पत्ता नाही त्याचा. थोड्या वेळाने ते गलबत हाकारले गेले. वालजीशिवायच ते गेले. वर्तमानपत्रात जाहीर झाले की, वालजी समुद्रात बुडून मेला. वालजीच्या आश्चर्यकारक जीवनाच्या हकीगती वर्तमानपत्रांतून आल्या. 'एका थोर चोराचा अंत' अशी कोणी शीर्षके दिली. हळुहळू वालजीचा सर्वांना विसर पडला. पोलिसांनाही विसर पडला. त्यांना हायसे वाटले. सतरांदा त्यांच्या हातावर तुरी देणारा, त्यांची बेअब्रू करणारा, त्यांची परीक्षा घेणारा जगातून एकदाचा नाहीसा झाला.

❋ ❋ ❋



दुःखी : प्रकरण सहावे

# लिलीची भेट



कोण चालला आहे तो मुशाफिर? काठीला अडकवलेले एक गाठोडे त्याच्या पाठीवर आहे. त्याची दाढी वाढलेली आहे. तो का पठाण आहे? तो जरा वाकलेला का दिसतो? वयाने का जरा वाकला? त्याचे डोळे पाहा. जरा पिंगट आहेत, नाही? परंतु त्यांत प्रेमळपणा आहे. आपल्याच तंद्रीत आहे. चालला आहे काही गुणगुणत.

संध्याकाळ होत आली. तो जरा झपझप जाऊ लागला; परंतु वाटेत अंधाराने त्याला गाठलेच. रात्र झाली. चांदणे नव्हते. आजूबाजूला झाडी होती. आमचा प्रवासी चालला होता. मधूनमधून शीळ घालीत होता. त्याला दूर दिवे दिसले. गाव. गाव जवळ आला. त्याला पाहिजे होता तोच गाव होता. ते दिवे दिसताच त्याच्याही डोळ्यांत जरा प्रकाश आला.

जवळ का ओढा वाहात होता? पाणी पडावे तसा आवाज येत होता. लहानसा का धबधबा होता तिथे?—आमच्या प्रवाशाला तहान लागली होती.तो शीळ घालीत पाण्याच्या आवाजाच्या अनुरोधाने चालला. तो एकदम उभा राहिला. का बरे? काय त्याला दिसले?

'घाबरू नकोस मुली. मी भूत नाही, पिशाच्च नाही. मी माणूस आहे. वाटेचा वाटसरू आहे. तू रात्राची एकटी कुठं जातेस?' त्याने तेथे दिसलेल्या लहान मुलीला विचारले.

'तुम्ही मारणार नाही मला? तुम्ही चोर नाही?' तिने विचारले.

'लहान मुलीला कोण मारील बेटा?'

'खाणावळवाला तर सारखं मारतो मला.'

'तू का खाणावळवाल्याकडे असतेस?'

'हो.'

'तुझे आईबाप कुठं आहेत?'

'आई आता नाही. ती मागं माझ्यासाठी पैसे पाठवी; परंतु बरेच वर्षांत आले नाहीत. खाणावळवाला म्हणाला, 'तुझी आई मेली.' तो मला सारखं काम करायला लावतो. 'फुकट का खायला घालू?' असं म्हणतो. पहाटे चार नाही वाजले तो मला उठावं लागतं, थंडीत मी गारठते; परंतु मला काम करावं लागतं. माझे हातपाय फुटतात; परंतु कुरकुर केली तर चाबकाचा मार. मला भांडी घासावी लागतात. या झऱ्यावरून पाणी न्यावं लागतं. आई नसली म्हणजे असं होतं. कुठं गेली माझी आई? का गेली ती मला सोडून? मी तिच्याजवळ राहिल्ये असते. तिच्याबरोबर मेल्ये असते. कुठं आहे माझी आई?'

ती मुलगी रडू लागली. त्या वाटसरूच्याही डोळ्यांत पाणी आले.

'उगी बेटा. रडू नकोस. तुझं नाव काय?'

'लिली.'

'किती गोड नाव!'

'जाऊ दे आता मला. उशीर झाला तर मारतील.'

'थांब, मीही तुझ्याबरोबर येतो. मला कोणत्या तरी खाणावळीतच उतरावयाचं आहे. तुझ्या खाणावळीत उतरू?'

'हं उतरा आणि माझ्याबरोबर चला. एक गिऱ्हाईक मी मिळवून आणलं असं पाहून त्याचा राग कमी होईल. चला.'

'तुझी घागर जड आहे. दे, मी घेतो.'

'तुम्ही कशाला घेता? तुम्ही इतके कसे दयाळू? अशी दयाळू माणसं जगात असतात?'

'कुठं कुठं असतात. दे, खरंच दे घागर.'

'परंतु मालकानं पाहिलं तर तो रागावेल.'

'तुझी खाणावळ आली, म्हणजे पुन्हा तुझ्या कमरेवर ती मी देईन. समजलं ना? दे बाळ.'



त्याने तिच्याजवळची ती घागर घेतली. एका हातात लोंबकळवीत तो चालला. तिची हकीगत तो ऐकत होता. मधूनमधून तिला प्रश्न विचारीत होता. खाणावळ जवळ आली.

'त्या दुकानासमोर आमची खाणावळ आहे. द्या घागर. मी पुढं जाते व सांगते की, एक गिऱ्हाईक आणलं आहे. म्हणजे उशीर झाल्याबद्दल तो रागावणार नाही.' लिली म्हणाली.

त्याने घागर दिली. लिली पुढे चालली. हा हळुहळू पाठीमागून जात होता. लिली घरात शिरली.

'कार्टे किती वेळ झाला ग ? पाणी आणायला पाठवलं तर तिकडेच बसलीस. थांब, तुला आज चौदावं रत्न दाखविलंच पाहिजे. बरेच दिवसांत चाबकाचा मार नाही मिळाला तुला. म्हणून अवदसा आठवली असेल, नाही का ? थांब. हे आटपू दे. मग घेत्ये तुझा समाचार. बघत्येस काय अशी ? ठेव घागर व ती ताटं दे नीट पटकन् घासून.'

खाणावळीणबाईचा तोंडपट्टा सुरू झाला.

'मी एक गिऱ्हाईक आणलं आहे. त्यांना रस्ता माहीत नव्हता, म्हणून उशीर झाला.' लिली भीतभीत बोलली.

'कुठं आहे गिऱ्हाईक?'

'हा मी इथं आहे. माझ्यामुळं मुलीला उशीर झाला. मी या गावात प्रथमच आलेला. रात्रीची वेळ. रस्त्यांचा परिचय नाही. ती मुलगी माझ्यासाठी हळुहळू येत होती. तिला रागावू नका.' तो वाटसरू म्हणाला.

'बसा आपण. विश्रांती घ्या. आता जेवण तयार होईल.' खाणावळवाला म्हणाला.

'लिल्ये, त्या दुकानातून सामान आलं. तू जातानाच निरोप सांगितलास वाटतं? बरं केलंस. उरलेले पैसे कुठं आहेत? अधेली ना दिली होती? चार आणे दुकानदारास दिलेस, उरलेले चार आणे कुठं आहेत? अग बोल की गधडे? चार आणे कुठं आहेत? पावली का होती? पाण्यात का पाडलीस? विधुळी पोर आहेस अगदी. तिकडे आई गेली मरून. तू आमच्या मानेस बसली आहेस. खायला घाला दिवसातून तीनदा आणि असे पैसे हरव. अग कुठं आहेत चार आणे? थांब, आज तुझं भरलं आहे. हे पाहुणे जेवून उठू देत. मग काढत्ये सारं.'

'लिल्ये, तुझा तो परकरबिरकर नीट झाड. असेल खिशात नाही तर –' आमचा पाहुणा आत येत म्हणाला.

गरीब बिचारी लिली. परकरात का कोठे पावली अडकते? परंतु तिने आपला परकर चारचारदा झटकला, तो काय आश्चर्य? एकदम पावली वाजली.

'अग, ती बघ. ती बघ पडली. कुठं अडकली होती बरं!' तो आमचा पाहुणा म्हणाला.

लिली परकर झाडीत असता त्या पाहुण्यानेच आपल्याजवळचे नाणे पटकन् फेकले होते. खाणावळवाल्याने ते पाहिले होते. हे गिऱ्हाईक श्रीमंत व उदार दिसते असे त्याला वाटले. तो बायकोजवळ जाऊन काही कुजबुजला. लिलीला याच्यादेखत बोलू नकोस असे त्याने सांगितले असावे; कारण मालकीणबाईचा सूर एकदम बदलला.

'लिल्ये, बेटा, तिकडे पडवीत बस. यांचं जेवण झालं, म्हणजे मग आपण सारी बसू. आधी हिरी, छबी, माणकी बसल्या आहेत. तू जरा मागून बस हो.' खाणावळीणबाई म्हणाली.

लिली पडवीत जाऊन बसली. खाणावळीणबाईच्या मुलींच्या बाहुल्या तिथे होत्या. लिलीने त्यांतली एक बाहुली उचलली. त्या बाहुलीजवळ ती खेळू लागली. त्या बाहुलीला पायांवर थोपटी, पोटाशी धरी. लिली आनंदली होती.

इतक्यात त्या मुली जेवून आल्या.

'हे ग काय लिलटल्ये? माझी का बाहुली घेतलीस? तुझे ते घाणेरडे हात! ते लावलेस ना? आई, आमच्या बाहुल्या हिनं घेतल्या बघ. मळवलीन् माझी बाहुली.' हिरी ओरडून म्हणाली.

'तुला तिथं पडवीत बस म्हटलं तर बाहुल्या उचलल्यास. आज झालं आहे काय तुला? तुझी आई असती तर दिल्यान् असत्या तिनं तुला बाहुल्या. आई नाही, बाप नाही. कोण देणार खेळणी? ठेव ती बाहुली खाली. ही उष्टी उचल व शेण लाव.' त्या मुलींची आई म्हणाली.

खाणावळीसमोर मोठे दुकान होते. त्या दुकानात खेळणीही होती. एक मोठे थोरले कचकड्याचे बाळ सजवून तेथे ठेवलेले होते. त्या गावात इतके महाग बाळ कोण घेणार? परंतु तो प्रवासी पाहुणा एकदम त्या दुकानात गेला.

'या बाळाची काय किंमत?' त्याने विचारले.

'पाच रुपये साहेब!' दुकानदार म्हणाला.

पाहुण्याने पाचाची नोट दिली. दुकानदार आश्चर्यचकित झाला. ते बाळ घेऊन तो पाहुणा आला.

'लिल्ये, जरा इकडे ये.' त्याने हाक मारली.

'जा. ते हाक मारताहेत. विचार काय हवं ते.' मालकीण म्हणाली. लिली आली. 'हे घे बाळ तुला खेळायला.' तो म्हणाला.

'मला? मला नको इतकं छान बाळ.' ती म्हणाली.

'अग घे की. ते देताहेत तर नको म्हणते! अडाणी आहे अगदी. घे ते.' मालकीणबाई बाहेर येऊन म्हणाली.

'खरंच का मला देता?'

'होय हो. घे. निजव ते मांडीवर किंवा अंथरुणात कुशीत घेऊन नीज. ते तुझं आहे. त्या मुलींच्या बाहुल्यांना नको हात लावू हो.' पाहुणा म्हणाला.

खाणावळवाला, त्याची बायको यांना मत्सर वाटला. त्यांच्या मुलीही तेथे आल्या. त्यांच्या बाहुल्या चिंध्यांच्या होत्या. लिलीजवळ ते सुंदर बाळ पाहून मालकाच्या मुली जळफळू लागल्या. 'ते पाहुणे गेले की, आम्हीच घेऊ ते बाळ, तुला चाबूक.' असे त्या पुटपुटल्या.

पाहुणे जेवले. त्यांची निजण्याची खास सुंदर व्यवस्था करण्यात आली होती. आता घरातील काम आटोपले. लिली ते बाळ कुशीत घेऊन झोपली. खाणावळीत शांत झाले.

दुसरा दिवस उजाडला. पाहुणे आज जाणार की काय?

'लिल्ये, त्या पाहुण्यांना विचार जा, आज राहाणार की जाणार ते.' मालकिणीने सांगितले.

पाहुणे नेहमी येथेच राहोत असे लिली मनात म्हणत होती. ती वर आली.

'काय बेटा?' पाहुण्याने प्रेमाने विचारले.

'तुम्ही इथं राहाणार का जाणार?' तिने विचारले.

'राहू का जाऊ?'

'राहा. नेहमी इथंच राहा.'

'इथं नेहमी कसा बरं राहू? लिल्ये, मी जाणार आहे. तू येतेस माझ्याबरोबर? माझ्या घरी राहा.'

'हं येते. कुठं आहे घर?'

'तिकडे लांब आहे.'

'परंतु हे मला सोडतील का?'

'त्यांना मी विचारतो.'

लिली खाली गेली. ते जाणार असे तिने सांगितले. मालक वरती गेला. त्याने पाहुण्यास नमस्कार केला. अदबीने तो त्यांच्याजवळ बसला.

'आपण जाणार म्हणता? राहात नाही?' त्याने विचारले.

'मला गेलं पाहिजे. आपले पैसे किती?'

'दीड रुपया.'

'दीड?'

'हो. कारण तुम्हाला निजायला पलंग दिला, गादी दिली. तुमची राजाप्रमाणे व्यवस्था ठेवली.'

'तुम्हाला एक विचारू का?'

'विचारा ना.'

'ही लिली तुमची मुलगी नाही. तिचे आईबाप नाहीत. तिला मी नेऊ का? तुम्हालाही ती जड आहे.'

'तुम्ही नेणार असाल तर न्या. परंतु तिच्या बाबतीत आमचे आजपर्यंत जे पैसे खर्च झाले ते तुम्ही दिले पाहिजेत.'

'काही वर्षं तिची आई पाठवीत होती ना पैसे? आणि ती मुलगीही घरी काम करते.'

'अहो, काम तर आता कुठं थोडं थोडं करते; परंतु सांडते, हरवते. तिची आई पैसे पाठवी, परंतु काही वर्षांत एक पैही आली नाही. म्हणतात, ती मेली म्हणून.'

'बरं. जो काय हिशेब होईल तो सांगा. पैसे मी देऊन टाकतो.'

'मी हिशेब आणून देतो.'

'लिलीला जरा वर पाठवा.'

'पाठवतो.'

मालक खाली गेला. त्याने लिलीला वर पाठवले.

'लिल्ये, येतेस ना माझ्याबरोबर? त्यांची परवानगी आहे.'

'हो येत्ये.'

'हा झगा बघ तुला होतो का? का हा परकर नेसतेस?'

'मला झगा आवडतो.'

'घालून बघ बरं.'

लिलीने तो सुंदर रेशमी झगा घेतला.. नंतर तिने तो अंगात घातला. अगदी बेताचा झाला.

'आजोबा, बघा छान झाला.'

'मी का आजोबा?'

'मग काय म्हणू?'

'आजोबाच म्हण.'

इतक्यात मालक वर आला. त्याने लिलीची तयारी पाहिली.

'हे घ्या बिल.' तो म्हणाला.

'साडेपाचशे रुपये?'

'हो, थोडे कमी करून सांगितले.'

'बरं, देतो हं पाठवून.'

मालक खाली गेला. पाहुण्याने आपल्या खिशातून कोऱ्याकोऱ्या नोटा साडेपाचशेच्या काढल्या. नंतर त्याने आपली काठी व ते गाठोडे घेतले.

'लिल्ये, चल. ते बूट घाल ना.'

'ते का माझ्यासाठी?'

'हो, वेडीच आहेस.'

लिलीने बूट घातले. पाहुण्याबरोबर ती निघाली. दोघे खाली आली. खाणावळवाल्याजवळ पाहुण्याने त्या नोटा दिल्या. नमस्कार करून तो निघाला. त्याचा हात धरून लिली निघाली.

गावातील लोक बघू लागले. लिली नाचत-गात चालली होती. तिचे कशाकडेही लक्ष नव्हते. गाव संपला. बाहेरचा रस्ता आला.

'लिल्ये, तुला मी खांद्यावर घेतो. म्हणजे आपण लवकर घरी जाऊ.'

'घ्या मला खांद्यावर.' ती हसून म्हणाली.

'नीट बसशील ना?'

'हो. झाडावर चिमणी बसते तशी मी बसेन.'

आजोबांनी लिलीला फुलाप्रमाणे उचलले. ती हसली. तोही हसला. झपाट्याने वाघासारखा तो चालू लागला. आता रानातून रस्ता होता. लिलीला भीती वाटत होती. पुढे दाट जंगल लागले. ओळंबलेली झाडे लिलीच्या डोक्याला भेटायला येत. लिलीच्या केसांना पाने, लता-वेली लागत.

तिसरा प्रहर होत आला. खांद्यावर बसून लिली कंटाळली असेल असे आजोबांना वाटले. ते जरा थांबले. लिली खाली उतरली. त्यांनी लिलीला खाऊ दिला. इतक्यात पाठीमागून कोणी तरी येत आहे असे त्यांना वाटले. त्यांनी नीट न्याहाळून पाहिले. तो खाणावळवाला येत होता. ती दोघे थांबली. खाणावळवाला जवळ आला.

'का, तुम्ही का पाठोपाठ?'

'हिचे आणखी पैसे पाहिजेत.'

'आणखी ?'

'हो. माझा हिशेब चुकला.'

'तू चावट आहेस. तू पैसे मागितलेस तेवढे मी दिले. या मुलीला रात्रंदिवस राबवलंस. फुकट का खायला घातलंस ? तिच्या आईजवळून सारखे पैसे मागत असस. आजारी आहे, पैसे पाठवा. थंडीसाठी कपडे करायचे आहेत, पैसे पाठवा. कोणते रे हिला कपडे केलेस ? लफंग्या, जा. निमूटपणं जा. नाही तर हा सोटा पाहिलास ना ?'

'परंतु मी मुलगी देणार नाही. तिच्या आईचं पत्र आणा व मग मुलगी न्या. तुम्हीच लफंगे दिसता. मला फसवून मुलगी नेऊ पाहता.'

आजोबाने आपल्या अंगरख्यातून एक चिठ्ठी काढली. त्याने ती त्या खाणावळवाल्यास दाखविली.

'आहे ना तिच्या आईची चिठ्ठी ? ओळखता की नाही अक्षरं ? तिच्या आईनंच हिला आणा असं सांगितलं आहे. जा. माघारा जा. खबरदार पाठोपाठ येशील तर. नीघ.'

खाणावळवाला भीत भीत माघारा चालला. आजोबांनी लिलीला खांद्यावर घेतले. पुन्हा ते झपझप वेगाने चालू लागले. त्यांनी पुन्हा मागे वळून पाहिले. तो तो खाणावळवाला आहेच. आजोबांनी अशा काही प्रखर दृष्टीने त्याच्याकडे पाहिले की, तो खाणावळवाला घाबरला. तो मागे मागे जात चालला. गेला, दूर गेला, दिसेनासा झाला. दातओठ खात तो परत चालला होता. 'काय करू रे, बरोबर पिस्तुल आणायला विसरलो. चुकलो. इथंच याचा बळी घेतला असता. माझा अपमान ? या चिमुरड्या पोरीच्यादेखत माझा अपमान ? या अपमानाचा सूड घेईन. त्या पोरीचे पुन्हा हाल हाल करीन. रोज चाबकानं तिला फोडीन. अपमान. विसरणार नाही मी अपमान. या अपमानाचा सूड घेण्यासाठीच आता जगायचं. बस्स, ठरलं' असे म्हणत तो खाणावळवाला घरी गेला.





दुःखी : प्रकरण सातवे

# तो तरुण



मुंबई शहरात एक सुंदर बंगला बांधून तो जहागिरदार राहात होता. तो आता म्हातारा झाला होता. तरी त्याची तरतरी कायम होती. जुने मजबूत हाडपेर होते. घोड्याच्या गाडीतून तो रोज फिरायला जायचा. अजून मुंबईत मोटारी फार झाल्या नव्हत्या. क्वचित एखादी कोठे नमुना म्हणून असली तर. घोड्यांच्या ट्रामगाड्या होत्या. श्रीमंत लोक बग्गी ठेवीत.

या जहागिरदाराला एक मुलगी होती. एका सरदाराशी त्याने तिचा विवाह केला होता; परंतु १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात हा सरदार स्वातंत्र्याच्या बाजूने लढत होता. तो प्रयत्न अपयशी झाला. गुलामगिरी झाली. जहागिरदाराचा जावई नाना कारस्थाने करून वाचला. आयुष्य संपले नव्हते म्हणूनच तो वाचला.

सासरे-जावयाचे एके दिवशी कडाक्याचे भांडण झाले.

'तुम्ही हे क्रांतीचे मार्ग सोडा. आता ज्यांचं राज्य आहे त्यांची सेवा करा. माझं म्हाताऱ्याचं ऐका.'

'तुम्हा जहागिरदारांचं ठीक आहे; परंतु गरिबांचं काय? उद्योगधंदे बसत चालले. बेकारी वाढत चालली. शेतकऱ्यांत तर हाहाःकार उडाला आहे. कुठं कुठं शेतकऱ्यांचे उठाव होत आहेत. ते बंड करीत आहेत. त्यांची बाजू कुणी घ्यायची? मी गरिबांसाठी उभा राहीन!' जावई म्हणाला.

'तुमचं आमचं पटायचं नाही. तुम्हाला माझी मुलगी देऊन मी फसलो. तिला तुम्ही सुख लाभू देणार नाही. तुम्ही जाल तुरुंगात, अंदमानात. माझ्या मुलीनं काय करावं? तिच्या लहान मुलानं उद्या कुणाच्या तोंडाकडे पाहावं?'

'तुमची मुलगी तुमच्या घरी ठेवा. तुमचा नातू तुमच्याजवळ ठेवा. मी एकटा राहीन. माझं ध्येय व मी. जातो मी.'

असे म्हणून जावई गेला तो गेला. तो पुन्हा सासऱ्याकडे आला नाही. त्या जहागिरदाराची मुलगी माहेरीच राहू लागली. तिचा मुलगा तिच्याजवळ होता. म्हातारा नातवावर फार प्रेम करी. सारी इस्टेट तो नातवालाच देणार होता.

नातू मोठा झाला. तो शिकू लागला. त्याच्या अभ्यासाची स्वतंत्र खोली होती. त्या खोलीत सुंदर सुंदर वस्तू होत्या. सुंदर चित्रे होती. नातवाचे नाव दिलीप होते. दिलीप रात्रंदिवस वाचीत बसे. आपला नातू खूप अभ्यास करतो, याचे आजोबाला कौतुक वाटे; परंतु दिलीप का अभ्यास करीत असे? त्याला वाचनाचे वेड लागले. विशेषतः इतिहासाची त्याला गोडी लागली. जगातील सर्व देशांचे इतिहास त्याने वाचले. जगातील राज्यक्रांत्यांचे इतिहास वाचले. हिंदुस्थानचा इतिहास तर त्याने नीट अभ्यासला. तरुण दिलीप क्रांतिकारक झाला.

तरुणांचे एक मंडळ स्थापिले गेले. त्यात दिलीप प्रमुख होता. दिलीप आर्थिक मदत करी. मंडळाचे ग्रंथालय होते, मंडळाची एक भाड्याची जागा होती. तेथे तरुण जमत, चर्चा करीत. ते तरुण मुंबई शहरातील कामगारांत जात. मुंबईत नवीन गिरण्या सुरू झाल्या होत्या. कामगारांचे हाल होत होते. बेकार लोकांच्या झुंडी खेड्यापाड्यांतून मुंबईत येत व भटकत. हे तरुण त्यांच्यात जात. त्यांच्यात क्रांतीच्या गोष्टी बोलत.

या तरुणांच्या बैठकी कधी कधी रात्रभर चालत. दिलीप मग तेथेच झोपे. दुसऱ्या दिवशी घरी येई.

'दिलीप, रात्री कुठं होतास?'

'आम्ही अभ्यास करीत होतो.' तो उत्तर देई.

'प्रकृती सांभाळून अभ्यास कर बाळ.' असे म्हातारा प्रेमाने म्हणे.

एके दिवशी दिलीपच्या हातात म्हाताऱ्याने एक पत्र दिले. दिलीपने ते वाचले. 'माझ्या बाबांचं पत्र.' तो म्हणाला.

'हो. ज्याचं तोंड तू कधी पाहू नयेस असं मला वाटे त्याचं पत्र.'

'मला आधी का दिलं नाहीत ? बाबा जिवंत असतील का ? मरताना मला भेटण्याची त्यांना इच्छा होती. माझे बाबा. मी त्यांना कधी पाहिलं नाही. तुम्ही ताबडतोब का दिलं नाही हे पत्र ? मरतानासुद्धा का मनात अढी धरायची ?'

दिलीप ते पत्र घेऊन बाहेर पडला. त्या पत्रातील पत्त्याप्रमाणे तो गेला. तो जिना चढू लागला. त्याच्याने चढवेना. त्याचे प्राण जणू गळून गेले होते. असतील का बाबा जिवंत ? तो वर गेला. तो काय ? ती खोली रिकामी होती !

'माझे बाबा !' त्याने टाहो फोडला.

'तुझे बाबा तुझी आठवण करीत गेले. त्यांचं प्रेत सकाळी नेण्यात आलं. तुझ्यासाठी लिहिलेलं एक पत्र त्यांच्या उशाशी होतं. हे घे ते पत्र.' शेजारचे सद्गृहस्थ म्हणाले.

दिलीपने ते पत्र मस्तकी धरले. ते पत्र त्याने खिशात ठेवले. तो त्या रिकाम्या खोलीत शून्य मनाने बसला. तो इकडे तिकडे बघत होता. कोठे तरी पिता दिसेल असे का त्याला वाटत होते ? बाबा, कोठे गेले बाबा, असे हात वर करून तो म्हणे. त्याने त्या खोलीला साष्टांग प्रणाम केला. त्या खोलीत डोळे मिटून तो बसला. पित्याची काल्पनिक मूर्ती का तो घडवीत होता ? मनोमंदिरात ठेवू पाहात होता ?

शेवटी तो उठला. तो पुन्हा आपल्या आजोबांच्या घरी आला. तो आपल्या खोलीत बसला. त्याने आतून कडी लावून घेतली. त्याने पित्याचे ते पत्र अत्यंत भक्तिभावाने फोडले. काय होते त्या पत्रात ?

*'चिरंजीव प्रिय दिलीप,*

*बाळ, तुझी माझी भेट होईल की नाही देवाला माहीत; परंतु माझी भेट न झाली तर मरणाऱ्या पित्याची शेवटची इच्छा तुला कळवावी म्हणून हे पत्र मी लिहून ठेवीत आहे. तुझ्या पित्याच्या दोन इच्छा आहेत :*

*तू गरिबांची बाजू घेणारा हो. गरिबांसाठी क्रांती करणारा हो. जुन्या रूढी, जुनी समाजरचना यांना मूठमाती देण्यासाठी उभा राहा. क्रांतीचा झेंडा हाती घे.*

*दुसरी गोष्ट म्हणजे, मागे स्वातंत्र्ययुद्धात लढताना मी जखमी होऊन पडलो होतो. माझ्या अंगावर अनेकांचे मुडदे पडले होते. त्यांच्या खाली मी गुदमरलो होतो; परंतु मध्यरात्रीची वेळ असेल, कोणी तरी त्या वेळेस आले. माझ्या*

*गळ्यातील सोन्याची साखळी काळोखात कोणी तरी ओढली. माझ्या अंगावरचे मुडदे त्याने दूर केले. ती साखळी घेऊन तो गेला. तो का चोर होता? कोणी का असेना, परंतु मला हवा मिळाली. माझे प्राण परत आले. हळुहळू उठून मी निसटून आलो. माझे प्राण वाचवणारा तो अज्ञात इसम जर कधी काळी तुला भेटला तर त्याला प्रेम दे. त्याला जरूर पडली तर मदत दे, साहाय्य दे. बाळ, या तुझ्या पित्याच्या दोन इच्छा. आशीर्वाद. गरिबांसाठी झगड. चांगला हो, मोठा हो.'*

ते पत्र दिलीपने कितीदा तरी वाचले, त्याने मनाशी काही तरी ठरविले. पित्याच्या सांगण्याप्रमाणे तो वागू लागला. आधीपासूनच तो क्रांतिकारक होता. आता त्याच्या वृत्तीत उत्कटता आली. निश्चितता आली. तीव्रता आली. त्याने कागद, लिफाफे छापून आणले. त्या कागदांवर 'क्रांतीचा जय असो' अशी वर वाक्ये असत. क्रांतीचा झेंडा छापलेला असे. त्याने पित्याचे ते पत्र एका सुंदर चंदनी पेटीत रेशमी रुमालात गुंडाळून ठेवले. त्या पत्रावर तो रोज गुलाबाच्या फुलाच्या पाकळ्या वाही. त्या पत्राला प्रणाम करी.

आजोबाला नातवाच्या वर्तनाचा संशय येऊ लागला. दिलीप अलिकडे घरी फारसा नसे. आजोबांशी किंवा आईशी पूर्वीप्रमाणे तो प्रेमळपणाने बोलत बसत नसे. एके दिवशी आजोबा त्याच्या खोलीत गेले. त्यांनी तेथील पेटी उघडली. तो ते छापलेले कागद, ते छापलेले लिफाफे. 'क्रांतीचा जय असो' वगैरे ती ब्रीदवाक्ये. क्रांतीच्या झेंड्याची ती खूण. आजोबा संतापले. ते बिथरले. त्यांनी त्या कागदांच्या चिंधड्या केल्या. ते आणखी पाहू लागले. तो ती चंदनी पेटी. त्यांनी ती उघडली. तो रेशमी रुमालात ते पत्र. ते पत्र त्यांनी वाचले. त्यांच्या तळपायाची आग मस्तकात गेली. जिवंतपणी याच्या बापाला मी करू दिले नाही, ते त्याने मरताना केले. या पत्रामुळे हा पोरटा बिघडला. म्हाताऱ्याने ते पत्र फाडले. त्याने ती चंदनी पेटी कोपऱ्यात भिरकावली.

इतक्यात दिलीप येऊन तेथे उभा राहिला.

'आजोबा, तुम्ही हे काय केलंत? हे पत्र फाडलंत! मला प्राणाहून प्रिय असलेलं पत्र तुम्ही फाडलंत. या पत्राच्या नाही तुम्ही चिंधड्या केल्यात, माझ्या शरीराच्या केल्यात. का हा दीर्घद्वेष? पित्याची मरताना तुम्ही भेटही होऊ दिली नाहीत. पित्याचं उभ्या जन्मात मला दर्शन होऊ दिलं नाहीत. माझी

आठवण करीत माझे बाबा गेले. माझ्यासाठी त्यांचे प्राण घुटमळत असतील; परंतु तुम्ही ते पत्र मुद्दाम उशीरा दिलंत. पितापुत्रांची ताटातूट केलीत आणि पित्याची आठवण म्हणून असलेलं हे एक पत्र, ही पित्याची शेवटची इच्छा, शेवटची आशा – तीही पायांखाली तुडविलीत. दुसऱ्याच्या भावना म्हणजे का कचरा? असे कसे तुम्ही! इतकी कशी तुमची कठोर हृदयं? श्रीमंतीनं, जहागिरीनं अशी दगडासारखी मनं होणार असतील तर आग लागो त्या श्रीमंतीला!'

दिलीप थरथरत होता. पित्याच्या पत्राचे तुकडे तो गोळा करू लागला.

'दिलीप खाली ठेव ते तुकडे. त्यांना काडी लाव. माझ्या घरात राहायचं असेल तर माझ्या इच्छेप्रमाणं वाग. नाही तर तुला दाही दिशा मोकळ्या आहेत.' आजोबा करारी आवाजात म्हणाले.

'ठीक. मी जातो. हे पत्राचे तुकडे हीच माझी खरी संपत्ती. ही संपत्ती घेऊन जातो. हे अंगातील कपडे असू देत. नेसूचं धोतर असू दे. तितकी भीक घाला. मी जातो.' असे म्हणून दिलीप निघाला. ते पत्राचे तुकडे खिशात घालून निघाला. आजोबा, आई यांना सोडून ध्येयाची पूजा करायला तो बाहेर पडला.

आजोबा तेथेच उभे राहिले. त्यांनी बाहेर दारात जाऊन पाहिले. त्यांनी रस्त्याकडे पाहिले; परंतु दिलीप केव्हाच दूर गेला होता.



दुःखी : प्रकरण आठवे

# भूत बंगला

लिली व वालजी त्या भूत बंगल्यात राहात होती. मुंबईतील अगदी दूरच्या गरीब वस्तीत. तो प्रचंड बंगला होता. त्या बंगल्यात शेकडो खोल्या होत्या. त्या बंगल्यात भुते आहेत अशी आख्यायिका होती, म्हणून फारसे कोणी तेथे राहायला येत नसे. तेथे भाडे थोडे असे. बरेच गरीब लोक हळुहळू तेथे राहायला येऊ लागले. गरिबांना भुते थोडीच बाधा करणार? दारिद्र्याचे भूत ज्याच्या मानगुटीस बसलेले, त्याला बाकीची भुते साधी वाटतात. बिऱ्हाडे बदलता बदलता वालजीही तेथे आला.

'लिल्ये, तू फार बाहेर जात जाऊ नकोस. घरातच खेळ. घरातच वाच हो.' वालजी म्हणाला.

'तुम्ही सांगाल तसं. तुम्ही किती प्रेम करता माझ्यावर? मला निजवता, थोपटता. जणू मी कुकुलं बाळ!'

'तू का मोठी झालीस?'

'नाही का?'

'मग नको का थोपटत जाऊ?'

'थोपटा. तुमचा हात म्हणजे आईचा हात. माझ्या आईबापांचा हात मला आठवत नाही. तुमच्या हातात त्यांचं प्रेम आहे. आजोबा, तुम्हाला कोणी नाही?'

'आहे तर.'

'कोण आहे?'

'तू नाहीस का वेडे!'

'खरंच. तुम्ही व मी. मी आणि तुम्ही.'

'लिल्ये, ते शेजारी कोण आले आहेत राह्यला?'

'ते एक गरीब विद्यार्थी आहेत. ते वकिलीचा अभ्यास करतात. ते गरिबांचं राज्य करणार आहेत. ते सुद्धा एकटे आहेत. इथं कमी भाडं म्हणून राह्यला आले आहेत.'

'त्याच्याजवळ फार बोलत नको जाऊ.'

'तुम्हाला जगाचा विश्वास नाही वाटतं?'

'जगात सारं दिसतं तसं नसतं. आपल्याला जपून राह्यला हवं बाळ, हो.'

'बरं आजोबा. तुम्ही सांगाल तशी मी वागेन.'

वालजी व लिली तेथे राहात, परंतु वालजी दिवसभर बाहेर असे. घरी फारसा येत नसे. सकाळी सात आठ वाजता तो बाहेर पडे. मग जेवायला येई. पुन्हा जाई, तो रात्री येई. रात्री लिली निजली म्हणजेही तो बाहेर जाई. मग केव्हा तरी येई. त्याने भूत बंगल्यात जागा घेतली होती, तशीच दुसरीकडेही एक जागा होती. त्या जागेतही दिवसाचा काही वेळ तो राही. वालजीच्या अनेक खोल्या, अनेक बिऱ्हाडे, तो सर्व ठिकाणी थोडा थोडा राही. एक वालजी अनेक होई.

एके दिवशी सकाळी वालजी बाहेर पडत होता. तो मालक तणतणत होता. एक प्रौढ मुलगी तेथे होती. तिच्या अंगावर चिंध्या होत्या. कोळशांनी हात काळे झाले होते.

'तुम्ही खोली खाली करा. चार महिन्यांचं भाडं थकलं. हा काय फाजीलपणा!' मालक म्हणाला.

'परंतु बाबा आजारी आहेत. आईलाही काम करवत नाही. काय करायचं? आम्हाला घालवू नका. कुठं जाऊ आम्ही?' ती मुलगी म्हणाली.

'किती द्यायचं आहे तुमचं भाडं?' वालजीने विचारले.

'चार महिन्यांचं. वीस रुपये.' ती मुलगी म्हणाली.

'मी देतो हो. जा तू. गरिबांची दैना असते.' तो म्हणाला.

वालजी जरा बाजूला गेला. त्याने कोटाची शिवण जरा ढिली करून आतून नोटा काढल्या. त्या मालकाला त्याने त्या दिल्या. ती मुलगी आभार मानून गेली. तो मालक वालजीकडे साशंकतेने पाहू लागला. हा मनुष्य चोरबीर तर

नाही ? कोटात असे कसे पैसे ठेवतो, असे त्याला वाटले. त्याने पोलिसांस कळविले. पोलिस त्या वाड्याभोवती घिरट्या घालू लागले.

वालजीच्या चाणाक्ष नजरेतून ती गोष्ट चुकली नाही. त्याने एके दिवशी बिऱ्हाड बदलले. तो अन्यत्र राहावयास गेला. ज्या खोलीत वालजी राहात होता, त्या खोलीत ज्यांचे भाडे त्याने देऊन टाकले होते ते बिऱ्हाड आले.

त्या बिऱ्हाडकरूची आपणास माहिती हवी. त्याला तीन मुली आहेत. एक मुलगा आहे. त्याची बायको आहे. किती दिवस झाले त्यांना मुंबईत येऊन ? कोणाला माहीत ? अत्यंत दरिद्री अशी त्यांची अवस्था असावी. त्यांच्या खोलीत सामान फार नाही. एकदोन खुर्च्या आहेत. थोडी भांडीकुंडी. त्या मुलीची आई दिसायला उग्र होती आणि त्या मुलीचा बाप, तोही भेसूर दिसे. त्या आईबापांना हसताना कोणी पाहिलं नसेल. हसणे जणू त्यांना माहीतच नव्हते. नेहमी दुर्मुखलेली त्यांची तोंडे.

मोठी मुलगी मोलमजुरी करायला जाई. ती असेल सोळा सतरा वर्षांची. तिच्या पाठची, असेल चौदा पंधरा वर्षांची. तिच्याहून लहान ती दहा वर्षांची आणि मुलगा सातआठ वर्षांचा असेल.

ती चौदापंधरा वर्षांची मुलगी आहे ना ? ती फार सुंदर नाही; परंतु एक प्रकारचा प्रेमळ भाव तिच्या डोळ्यांत आहे. त्यामुळे तिच्या चेहऱ्याला थोडी मोहकता आली आहे. तो जो तरुण शेजारच्या खोलीत राही, त्याच्याकडे ती सारखी बघत राहायची. एके दिवशी ती त्याच्या खोलीत गेली. एकदम त्याच्या खुर्चीच्या मागे उभी राहिली आणि समोरच्या आरशात पाहू लागली.

'मी वाईट आहे का हो ? ती मागं इथं मुलगी राहात असे तिच्याहून मी वाईट आहे ?' तिने विचारले.

'तू केव्हा पाहिलीस ती मुलगी ?' त्याने विचारले.

'शंभरदा पाहिली आहे. तिचा तो म्हातारा श्रीमंत आहे, नाही ? तिला चांगले कपडे मिळतात. कपडे चांगले असले म्हणजे कुरूप मनुष्यसुद्धा चांगलं दिसतं, नाही ? माझे कपडे हे असे ! मी कशी बरं सुंदर दिसेन ? परंतु मी का फार वाईट आहे ?'

'तू किती वटवट करतेस ?'

'मी जाऊ? माझं बोलणं तुम्हाला आवडत नाही? तुम्ही एकटे आहात. इथं तुम्हाला कंटाळा नाही येत? कोणाशी बोलणार, कोणाशी हसणार? तुम्हाला माणसांचा कंटाळा आहे? मी आवडत नाही तुम्हाला? तुमच्या टेबलावर बघा वस्तू कशा पडल्या आहेत. त्या मी लावून ठेवत्ये हं. सुंदर सजवून ठेवते टेबल.'

असे म्हणून तिने टेबलावरची पुस्तके, वह्या वगैरे सारे नीट लावून ठेवले. तिने केरसुणी आणून खोली स्वच्छ केली.

'तू कशाला झाडतेस?' तो म्हणाला.

'का बरं? खोली स्वच्छ दिसेल.'

'परंतु तू का मोलकरीण आहेस?'

'मोलकरणीनंच काम करावं असं का आहे? घरातील काम आपण नाही करीत?'

'माझी खोली का तुझं घर?'

'हो.'

'तुझं नाव काय?'

'माझं नाव छबी.'

'छान आहे नाव.'

'आणि तुमचं?'

'दिलीप.'

ती मुलगी एकदम निघून गेली. दिलीपची खोली जेव्हा जेव्हा उघडी असेल तेव्हा तेव्हा ती यायची. ती बोलत बसायची. कधी कधी ती त्याच्या खुर्चीच्या मागे उभी राहून त्याच्या केसांशी खेळायची. एखादे वेळेस दिलीप रागे भरे. ती मग ओशाळून निघून जाई.

वालजी, लिली कोठे आहेत? लांब आहेत. अफाट मुंबई शहरात कोणाचा कोणाला पत्ता नसे; परंतु ती पाहा एक मुलगी हिंडते आहे. ती कोणाला तरी शोधते आहे. कोण हवे तिला? इतक्यात तिला एक उंच मनुष्य दिसला. ती गर्दीतून धावत त्याच्याकडे गेली. तिने त्याचा कोट धरला.

'तुम्ही मला ओळखलंत का?' तिने विचारले.

'हो. कसं आहे तुमचं?'

'भाडं थकलं आहे. आई आजारी आहे. बाबांना दमा लागतो. मी एकटी मोलमजुरी करते. तुम्ही काही मदत करता का?'

'किती हवी मदत?'

'द्याल तितकी थोडीच आहे.'

त्याने खिशात हात घातला. पंधरा रुपये होते ते त्याने दिले. त्या मुलीचे तोंड फुलले.

'किती तुम्ही उदार!'

'तुला मदत लागेल तेव्हा मागत जा.'

'परंतु तुम्ही कुठं भेटणार?'

'असाच या बाजूला कुठं तरी.'

ती निघून गेली. तिने घरी आईबापांना ती गोष्ट सांगितली.

'पुन्हा भेटले तर त्यांना सांग की, आमच्या घरी या. त्यांना म्हण की, आमच्या आईबापांना भेटायला या. तुम्ही आलात तर त्यांना किती तरी बरं वाटेल.' बाप म्हणाला.

'कोणत्या दिवशी येणार ते ठरवून ये.' आई म्हणाली.

काही दिवस गेले. पुन्हा एकदा वालजीची व त्या मुलीची भेट झाली.

'काय ग, कसं आहे तुझ्या आईबापांचं?'

'तुम्ही या ना आमच्या घरी. आमचं कुणी नाही दुसरं. या शहरातून कुणी कुणाचं नाही. इतकी वर्षं आम्हाला येऊन झाली; परंतु कुणाशी ओळख ना देख. घरंही कितीदा बदलली. भाडं देता यायचं नाही. रात्री चोरून जायचं निघून. गरिबांची फार त्रेधा बघा.'

'औषध का देत नाही वडिलांना, आईला?'

'घरगुती औषध असतं. डॉक्टरची फी कोण देणार? तुम्ही या ना एक दिवस. याल का?'

'येईन. एखादे दिवशी रात्री येईन.'

'नक्की दिवस सांगा.'

'पुढच्या गुरुवारी रात्री दहा वाजता.'

'बरं; या हं.'

ती मुलगी घरी गेली. तिने आईबापांना सांगितले की, पुढच्या गुरुवारी रात्री दहा वाजता ते येणार आहेत. आईबाप गुरुवारची वाट बघत होते. गुरुवार आला. सायंकाळची वेळ होती. त्या तरुणाच्या शेजारच्या खोलीतील त्या मुली वगैरे आज घरात नव्हत्या. घरात फक्त नवराबायको दोघे होती. घरात काही तरी घासले जात होते. घराची दारे लावलेली होती. कशाला धार का लावली जात होती? कुऱ्हाड का कोयता? विळा का सुरा? का बरे? आज धार का लावली जात आहे? त्या तरुणाच्या कानांवर धार लावणे येत होते. तो चमकला. शेजारच्या त्या नवराबायकोस त्याने कधी पाहिले नव्हते. ती घरातून कधी बाहेर पडत नसत. ती छबी त्या तरुणाकडे येई; परंतु अलिकडे बरेच दिवसांत तीही फिरकली नव्हती. ते पाहा धार लावणे ऐकू येत आहे. तो तरुण वर पाहू लागला. दिलीपला प्रकाश दिसला. त्या खोलीतील दिव्याचा प्रकाश होता तो. वरती भिंतीला भोक होते. त्यातून तो प्रकाश येत होता. दिलीपने हळूच टेबल भिंतीजवळ नेले. टेबलावर खुर्ची ठेवली. तो खुर्चीमध्ये उभा राहून त्या भोकातून पाहू लागला. कुऱ्हाडीला धार लावली जात होती! जवळच एक भट्टीही पेटली होती. नवराबायकोचे बोलणेही चालले होते.

'आज घेतो सूड. इतकी वर्षं वाट पाहात होतो. या तापलेल्या सांडशीनं डोळे फोडीन त्याचे. का जीभ भाजू त्याची? या कुऱ्हाडीनं तुकडे उडवू? मला दया माया नाही. भूत मी. अग, मी तरुणपणी दरोडेखोरच होतो. त्या वेळेस पेंढारी-ठग असत, त्यांच्यात मी होतो. एकदा सत्तावन सालचं ते बंड झालं. त्या वेळेस एक मोठी लढाई झाली. हजारो मुडदे पडले होते. रात्रीच्या वेळी त्या मुडद्यांच्या अंगावरचे दागदागिने पाहायला मी गेलो होतो. एका मुडद्याच्या गळ्यातील साखळी हाताला लागली. त्याच्या अंगावर दहा मुडदे होते. ते केले दूर. ती साखळी ओढली; परंतु तो मुडदा जागा झाला! ती साखळी घेऊन मी पळालो. तिच्या भांडवलावर तर काढली खाणावळ. तुझ्याबरोबर लग्न केलं. पूर्वी माझी खाणावळ लढवय्याची खाणावळ म्हणून प्रसिद्ध होती. लोकांना मी खूप गप्पा सांगे. भिंतीवर लढायांची चित्रं काढीत असे. पुढं पोलिसांनी बंदी केली. तरी अजूनही मला लढवय्या म्हणून मानतात. मी होतो खुनी, दरोडेखोर. आज पुन्हा तसं व्हायचं आहे. समजलीस ना? त्या मुलींना सांगितलं आहे की, आज घरात कुणी यायचं नाही. तो वालजी आला की, त्याला खोली

दाखवून तिनं बाहेरच्या बाहेर जायचं, असं हिरीलाही सांगितलं आहे. आज घेतो सूड. त्या मारेकऱ्यांना बोलावलं आहे. ते येतीलच. चौघे आहेत ते. वालजी आला की, या खुर्चीवर त्याला बसवू. दार घेऊ लावून, घालू तोंडात बोळे व टाकू करकचून बांधून आणि मग हा लाल सांडस! ही कुऱ्हाड! सूड. आज घेतो सूड. रानातील अपमानाचा सूड. 'हा सोटा पाहिलास ना' असं म्हणाला. आज म्हणावं, ही कुऱ्हाड बघ. कशी छान धार लागली आहे. तुकडे तुकडे करीन बेट्याचे. हालहाल करीन; परंतु आधी मुलीचा पत्ता घेऊ या त्याच्याकडून. तिला मात्र जिवंत ठेवून छळायचं. समजलीस ना?'

खाणावळवाला कुऱ्हाडीला धार लावता लावता बायकोजवळ असे बोलत होता. दिलीप त्या झरोक्यातून बघत होता, ऐकत होता. तो भयंकर प्रकार पाहून त्याला कसे तरी वाटले. 'कोण मनुष्य? माझ्या बाबांना वाचवणारा तो हाच मनुष्य की काय? बाबांनी पत्रात लिहिलं होतं, 'माझ्या अंगावरचे मुडदे एकानं दूर केले. मला हवा मिळाली. माझे प्राण परत आले.' हाच तो मनुष्य चोरी करायला रणांगणावर गेला; परंतु न कळत बाबांना वाचवता झाला. शूरांच्या अंगावरचे कपडेलत्ते नेणारा मांग, लांडगा; परंतु त्यानं बाबांना वाचविलं आणि बाबांनी सांगितलं आहे की, त्याला प्रेम दे, साहाय्य कर. हा तर आज इथं कोणाचा तरी हालहाल करून वध करणार आहे. माझं कोणतं कर्तव्य? पोलिसांना वर्दी देणं हे.'

दिलीपने पोलिसांस सारे सांगितले. तो घरी परत आला. त्याने आपले पिस्तुलही तयार करून ठेवले. जर पोलिस वेळेवर नाही आले, तर झरोक्यातून गोळ्या घालण्याचे त्याने ठरवले.

रात्र होत आली. भूत बंगला भुतासारखा दिसू लागला. दहा वाजायची वेळ होत आली. ते पाहा कोणी तरी चार बुरखेवाले त्या खोलीत गेले आणि तो वालजी येत आहे. हिरी बाहेर उभी आहे.

'इकडे इकडे. या खोलीत आता आम्ही राहातो.'

'याच खोलीत मीही राहात असे.'

'खरं का?'

'हो. तिसऱ्या मजल्यावरची खोली. रस्त्यावरच्या खिडकीतून लिली नेहमी गंमत पाहायची. तिला मी बाहेर जाऊ देत नसे. मग ती नेहमी खिडकीत बसे.'

'ती खोली. मी बाहेर जाते जरा. तुम्ही जा आत.' असे म्हणून ती हिरी गेली.

वालजीने दार उघडले. घोंगड्या पांघरून नवराबायको बसली होती. काळोखात कोपऱ्यात ते बुरखेवाले होते.

'या, बसा खुर्चीवर.' नवरा कण्हत म्हणाला.

'सारखी दोघं आजारी आहोत. पांघरायला नाही. ही भट्टी ठेवली आहे पेटवून. पोरं भीक मागायला गेली आहेत. आणतील तुकडे तेव्हा शिळंपाकं खायचं.' बायको रडत म्हणाली.

'ते दार घ्या लावून. वारा नाही सहन होत.' नवरा म्हणाला. वालजीने दार लावले.

'ते उघडेल वाऱ्यानं. कडी लावा!' बायको म्हणाली. वालजीने कडी लावली. तो खुर्चीवर बसला. तो खिडकीतून बघत होता. इतक्यात ते चारी बुरखेवाले उठले. त्यांनी त्याच्या तोंडात बोळे घातले. भराभरा त्यांनी त्याला दोरखंडाने आवळले. खुर्चीला बांधले. ती नवराबायकोही त्या कामात सामील झाली.

झरोक्यातून तरुण दिलीप पाहात होता. त्याने पिस्तुल धरून ठेवले होते. ते पिस्तुल मारावयाचे धैर्य त्याला झाले असते का ? पित्याचे प्राण वाचवणाऱ्यावर का गोळी झाडायची ? त्याच्या मनात काहूर माजले होते. तो पाहात होता तो भेसूर प्रकार !

भट्टीतील निखारे फुंकले गेले. त्या निखाऱ्यांचा लाल प्रकाश खोलीत पसरला. दिवा तर मिणमिण करीत होता. भट्टीत सांडस होता. तो लाललाल झाला होता.

'तुम्ही ओळखलंत का मला ? तो खाणावळवाला मी. लिलीला छळणारा तो मी. जरा नीट बघा माझ्याकडे. पटली ओळख ? रानात मला दरडावलंत, लाल डोळ्यांनी पाहिलंत. त्या लाल डोळ्यांत आता हा लाल सांडस जाणार आहे. मी शब्दांनी बोलत नसतो. कृतीनं ! मी डाकू आहे. खुनी आहे. सूड घेतो आज;' परंतु आधी त्या मुलीचा पत्ता सांग. ती कुठं आहे ते सांग.'

तो लाल सांडस हातात घेऊन खाणावळवाला खुर्चीसमोर उभा राहिला.

'बोल, तिचा पत्ता सांग.' तोंडातील बोळा थोडा वेळ काढण्यात आला.



वालजीने पत्ता सांगितला. खाणावळवाला बाहेर गेला व त्याने शीळ घातली. एकदम हिरी आली. त्याने हिरीला त्या पत्त्यावर जाऊन तेथे ती मुलगी आहे का बघ म्हणून सांगितले. तो पुन्हा खोलीत आला; परंतु दार लावायचे राहिले, – म्हणजे कडी लावायची राहिली. पुन्हा बोळे घातले गेले.

'तुझ्या त्या लिलीचे हालहाल करीन. रोज चाबकांनी फोडीन तिला. तिला ठार नाही मारणार. तिला जिवंत ठेवीन. हाल करण्यासाठी जिवंत ठेवीन. तुझें तर तुकडे करायचे आहेत. हे पाहा चार दोस्त आहेत. ते तुझी खांडोळी करतील. मी लाल सांडसानं डोळे भाजीन, तुझी लांब जीभ भाजीन.'

खाणावळवाला जरा थांबला. खोलीत भीषण शांतता होती. वालजी हलू शकत नव्हता, बोलू शकत नव्हता. तो सिंह अडकून पडला होता, परंतु त्याच्या डोळ्यांत निर्भयता होती.

दाराशी हिरी आली. बाप बाहेर गेला. 'त्या पत्त्यावर लिली भेटली नाही. त्या पत्त्यावर कुणी राहात नाही.' असे तिने सांगितले. ती निघून गेली. बाप संतापाने घरात आला.

'हरामखोरा, फसवतोस काय? बोल, लिली कुठं आहे? बोल.' त्याच्या तोंडातील बोळा काढून खाणावळवाल्याने विचारले.

'अरे जा रे माकडा! ती लिली का तुझ्या हाती मी लागू देईन? माझे तिळाएवढे तुकडे केलेस तरी चालेल. लिलीचा, त्या अनाथ मुलीचा पत्ता मी सांगणार नाही. मला काय या लाल सांडसाची भीती दाखवतोस? मला भीती दाखवतोस?' असे म्हणून वालजीने दोरखंडातून हात एकदम मोकळा करून खाणावळवाल्याच्या हातातील तो लांब सांडस ओढून घेतला.

'हे बघ. या लाल सांडसानं मी माझं अंग स्वतः भाजून घेतो. बघ. हा बघ माझ्या देहावर ठेवतो. बघ.' असे म्हणून वालजीने खरोखरच तो लाल फाळ खांद्यावर ठेवला. चुर्र चुर्र झाले. चरबी जळू लागली. दिलीपला ते दृश्य बघवेना.

इतक्यात शिट्या झाल्या. पोलिस आले. दार उघडून आत आले. खाणावळवाला, ते चौघे साथीदार, ती बाई, सर्वांस एकदम पकडण्यात आले. पोलिस अधिकारी आत आला. तो खुर्चीवर त्याने कोणाला पाहिले?

वालजी? समुद्रात मेलेला वालजी? त्या शहराचा अध्यक्ष वालजी! 'वालजी मेला नाही एकूण? वा! तुम्हीही सापडलेत. ठीक. योगायोग तुमचा आमचा. यांच्या दोऱ्या मोकळ्या करा. मागं ते आपण होऊन स्वाधीन झाले होते. ते चोर असले तरी थोर आहेत.' तो पोलिस अधिकारी म्हणाला.

वालजी मोकळा झाला. तो पोलिस अधिकारी बाहेर खुर्ची टाकून बसला होता. त्याच्यासमोर खोलीतील एकेकाला जबानीसाठी नेण्यात येत होते. इतक्यात, त्या मुलीही आल्या. त्यांनाही पकडण्यात आले. ते चार खुनी, खाणावळवाला, त्याची बायको आणि हिरी या सर्वांना हातकड्या घालण्यात आल्या. छबी, तिची लहान बहीण व भाऊ यांना सोडण्यात आले.

'आता त्या खुर्चीतील माणसाला आणा.' अधिकारी म्हणाला. पोलिस आत आले, तो वालजी कुठं आहे? तेथे वालजी नव्हता. तो भूत बंगला होता. भुताटकी झाली काय? कोठे गेला वालजी? तो अधिकारी आत आला. तो खिडकीतून दोरखंड खाली सोडलेले आढळले. सारे स्पष्ट झाले. वालजी पळून गेला. क्षणभर ते सारे पोलिस व तो अधिकारी चकित झाले! परंतु तो अधिकारी निघून गेला. पोलिस त्या कैद्यांस घेऊन गेले.

त्या अधिकाऱ्याने सर्व शहरभर घोडेस्वार पोलिस पाठवले. त्या रात्रीच्या वेळी घोडेस्वार हिंडू लागले. वालजीचा शोध होऊ लागला. नाक्यानाक्याला पोलिस होते. वालजी घरी गेला. त्याने झोपलेल्या लिलीला उठविले. तिला उचलून तो एकदम निघाला. तो ज्या रस्त्याने जात होता, तिकडून घोडेस्वार येत होते. तो पुन्हा वळला. एका पुलाखाली लपला. पुन्हा बाहेर पडला. एका अज्ञात रस्त्याने तो निघाला. फारशी रहदारी तिकडे नव्हती. पुन्हा घोड्यांच्या टापांचा आवाज. वालजी पळत सुटला. रस्त्याच्या डाव्या बाजूला लांबच लांब भिंत होती. लिलीला पाठुंगळीस घेऊन कंदिलाच्या खांबावर तो चढला. 'लिल्ये, त्या भिंतीवर चढ.' तो म्हणाला. भिंतीकडे पाठ करून तो कंदिलाच्या खांबावर होता. लिलीने भिंत पकडली. नंतर तो भिंतीवर चढला. त्याने खिशातील दोरी लिलीला बांधून तिला खाली सोडले. त्याने उडी टाकली. भिंतीजवळ आत दोघे बसली.

'लिल्ये, लागलं नाही ना कुठं?' त्याने हळूच विचारले.

'नाही.' ती त्याला बिलगून बसली.





दुःखी : प्रकरण नववे

# प्रेमाचा अंकुर



पहाटेची वेळ झाली होती. बाहेर घोड्यांच्या टापा आता ऐकू येत नव्हत्या. तपास थांबला असावा. लिलीला जवळ घेऊन वालजी तेथे बसला होता. इतक्यात कंदील घेऊन कोणी तरी येत होते. कोण राहात होते त्या भिंतीच्या आत?

तो एक म्हातारा मनुष्य होता. त्याने भिंतीजवळ कसले तरी वेल लावले होते. पहाटेच्या वेळेला त्या वेलांवर कीड पडते अशी समजूत होती. म्हणून रोज त्या वेळेला तो म्हातारा येई व वेलांच्या पानांवरून हात फिरवी. ते वेल तो हळूच झटकी. आजही त्याप्रमाणे तो आला. लिली घाबरली. वालजीला संकट वाटले.

त्या म्हाताऱ्याला कोणी तरी दिसले. तोही घाबरला, परंतु धैर्य धरून त्याने विचारले, 'कोण आहे?'

'आम्ही दोन अनाथ माणसं आहोत. आधार द्या.' वालजी म्हणाला. कोणाचा हा आवाज? त्या म्हाताऱ्याला तो आवाज ओळखीचा वाटला. तो आठवू लागला. तो कंदील घेऊन पुढे झाला व त्याने नीट न्याहाळून पाहिले.

'कोण तुम्ही? तुम्ही तर माझे अन्नदाते. तुम्ही नगराध्यक्ष. तुमचा कारखाना होता. तुम्ही दवाखाना घातलात. तुम्ही मला या मठात नोकरी दिलीत. या मठाला तुम्ही देणगी दिली होतीत. वा महाराज, उठा, तुमच्या पाया पडतो. तुम्ही लाखोंना आधार दिलात. हजारोंचे तुम्ही अन्नदाते. तुमच्यावर अशी पाळी का यावी? उठा. थंडी आहे. माझ्या खोलीत चला. मी एकटा आहे. पलीकडे संन्यासी राहातात. संन्यासिनींचाही एक मठ आहे या बाजूला; परंतु मी एकटा

आहे. चला माझ्या खोलीत. कढत कढत दूध प्या. झोपा पांघरूण घेऊन. उठा देवा!' तो म्हातारा कृतज्ञतेने म्हणाला.

वालजीला वाटले, देवच भेटला. केलेला उपकार कधी कोठे कामाला येईल त्याचा काय नेम सांगावा? एखादे वेळेला उच्चारलेला गोड शब्द, एखादे वेळेस दिलेला आधार, केलेली मदत, कोठे फळास येईल त्याचा काय नेम? म्हणून जगात चांगले पेरीत जावे, ते उपयोगी येईल आज ना उद्या.

वालजी व लिली त्या म्हाताऱ्या रामजीच्या खोलीत गेली. रामजी त्या मठातील बागवान होता. तेथला तो माळी होता. वालजीकडे तो पुष्कळ वर्षांपूर्वी गेला होता. वालजीच्या सांगण्यावरूनच ही नोकरी त्याला मिळाली होती. लिली कढत दूध प्याली. ती झोपी गेली. वालजी व रामजी बोलत होते.

'रामजी, ही लिली काही वर्षं इथं राहिली तर चालेल का?'

'चालेल. इथं आता साऱ्या संन्यासिनीच राहाणार आहेत. संन्यासी इथून निघून जाणार. त्या संन्यासिनी लिलीला शिकवतील. लिली माझ्याजवळ राहील. मलाही तिची करमणूक होईल.' रामजी म्हणाला.

'परंतु लिलीला संन्यासिनी नाही हो करायचं!' वालजी हसून म्हणाला.

'ते आजच कशाला बोलायचं? लिली मोठी होऊ दे. शिकू दे. मग बाहेर सुरक्षित वाटलं म्हणजे तिला घेऊन जा.'

'मग मी जाऊ? मधून मधून मी भेटत जाईन.'

'आताच जाता? दोन दिवस इथंच लपून राहा. मग जा.'

'बरं.'

दोन दिवस वालजी तेथे लपून राहिला. एके दिवशी तो बाहेर निघून गेला. लिली तेथे मठात राहिली. रामजी तिला स्वतःची जणू मुलगी मानी. लिलीने फुलझाडे लावली. ती पाणी घाली. रामजीबरोबर काम करी. संन्यासिनींकडे ती शिकायला जाई.

'लिल्ये, किती फुलं केसांत घालतेस? इतकं नटून करायचं काय? तुला संन्यासिनी व्हायचं आहे ना? संसारात पडणाऱ्यांना भूषणं शोभतात. आपणाला एक वैराग्याचा दागिना.' ती मुख्य महंतीण म्हणाली.

'परंतु मला फुलं आवडतात आणि मी जन्मभर का इथंच राहू? ते दिलीप इथंच येतील, ते किती चांगले आहेत!' लिली म्हणाली.

'कोण दिलीप ?'

'होते एक विद्यार्थी.'

'ते सारं विसरून जा. इथं रामनामाचा जप कर. ब्रह्माचं चिंतन कर.'

'जे आवडते ते ब्रह्मच.'

'जे सर्वव्यापी ते ब्रह्म.'

'जे आपल्याला आवडतं तेच सर्वत्र आहे असं भासतं, नाही ?'

लिलीचे व संन्यासिनींचे असे संवाद चालायचे. त्या एखादे वेळेस लिलीवर रागावत; परंतु लिलीवर त्यांचेही प्रेम बसले. लिली म्हणजे त्या मठातील मैना होती !

वालजी तिकडे एका खोलीत राहात होता. एके दिवशी तो मनात विचार करीत होता. लिली आता मोठी झाली असेल. तिला मठातून आणले पाहिजे. लिलीला अशीच किती दिवस ठेवू? तिचे आता लग्न झाले पाहिजे. तिचा संसार एकदा थाटून दिला म्हणजे मी मोकळा झालो. तिच्या आईला दिलेल्या वचनातून मुक्त झाल्यावर वालजीचे काम संपले, असे विचार त्याच्या मनात येत होते.

लिली परत आली. तिच्यात आता चांगलाच फरक झाला होता. ती सुंदर तरुणी दिसत होती. ती पुष्कळ शिकली होती. ती आता घरी नाना पुस्तके वाचीत बसे. एके दिवशी लिली वालजीबरोबर फिरायला गेली. सार्वजनिक बागेत फिरायला गेली. ती एका बाकावर बसली. वालजी हिंडत होता. लिली एकटीच होती. इतक्यात एक तरुण येऊन त्याच बाकावर बसला. दोघांनी एकमेकांकडे पाहिले.

'दिलीप !'

'लिली !'

'किती दिवसांनी तुम्ही दिसलेत.'

'तुझं काय झालं मला कळेना.'

'तुम्ही रोज इथं फिरायला येता ?'

'रोज येत नाही; परंतु आता येत जाईन.'

'का बरं ?'

'म्हणजे इथं तू भेटशील.'

‘आपण तिकडे जाऊ त्या ताटव्याजवळ.’

‘चल.’

लिली व दिलीप तेथे बसली होती. थोड्या वेळाने वालजी आला. लिली पटकन उठून गेली. आता रोज लिली फिरायला येऊ लागली. वालजीच्या ती पाठीस लागे. लिली बगीच्यात प्रेम फुलवीत बसे. वालजी रस्त्यांतून हिंडे. रस्त्यांतील भिकाऱ्यांस वालजी पैसे द्यायचा. रोज तो पैसे देई. पोलिसांचे त्याच्याकडे लक्ष गेले. कोण हा माणूस? रोज कोठून आणतो पैसे? पोलिसांचे पुन्हा आपल्याकडे लक्ष आहे ही गोष्ट वालजीच्या ध्यानात आली. त्याने फिरायला येणे बंद केले. त्याने पुन्हा घरही बदलले.

दिलीप बागेत येई; परंतु लिली दिसेना. बागेत शेकडो सुंदर सुंदर सुगंधी फुले फुललेली असत; परंतु दिलीपचे लक्ष नसे. लिलीचे मुखकमल त्याच्या डोळ्यांसमोर असे. तो खिन्न होई, उदासपणे निघून जाई. एके दिवशी असाच तो उदासीन बसला होता, इतक्यात कोणी एक मुलगी आली.

‘तुम्ही असे उदासीन का? ती बरी आहे. ती दुसरीकडे राह्यला गेली आहे. मला आहे तिचा पत्ता माहीत. तुम्हाला दाखवू तिचं घर? माझ्याकडे बघा ना जरा. मी का इतकी वाईट आहे? तुमची खोली मी साफ करीत असे, तुमचे केस विंचरून भांग पाडीत असे. तुमच्यासाठी मी वाचायला शिकल्ये. तुम्ही का हो नाही मजवर प्रेम करीत? लिली. लिलीचं तुम्हाला वेड व मला तुमचं वेड. बरं. पुढच्या जन्मी तरी मला प्रेम द्या. या जन्मी मी पेरते. पुढच्या जन्मी सहस्रपट मिळो. चला, येता? मी दुरून दुरून चालेन, म्हणजे तुम्हाला लाज नको वाटायला. मी घर दाखवते. चला. असे उदास नका बसू. मी हसल्ये नाही तरी तुम्ही हसावं, आनंदात असावं असं मला वाटतं. उठा.’ छबी म्हणाली. तो निघाला. ती निघाली. बऱ्याच वेळाने एक घर आले.

‘त्या घरात ती राहाते. जात्ये मी. पुढच्या जन्मी द्या हो मला प्रेम आणि तुम्ही हसा. तुम्ही सुखी व्हा.’ असे म्हणून ती गेली.

दिलीप तेथे उभा होता. त्या घरात कोणी दिसत नव्हते. रात्र झाली तरी त्या घरात दिवे नव्हते. दिलीपने एक चिठ्ठी लिहिली; परंतु द्यायची कोणाला? त्याने दरवाजाजवळ दगडाखाली ती चिठ्ठी लिहून ठेवली. तो गेला.

लिलीचे हे घर एका बाजूला होते. तो बंगला होता. वालजी पहाटे उठला. तो अंगणातील बागेत हिंडत होता. दरवाजाजवळ त्याला दगड दिसला. रोज दगड नसतो. आज कोठून आला? त्याने उचलला. तो खाली चिठ्ठी. त्याने ती चिठ्ठी वाचली. ती प्रेमपत्रिका होती. वालजी गंभीर झाला. त्या बागेत फिरायला जाण्याचा हट्ट लिली का धरी ते त्याच्या लक्षात आले. लिली प्रेमात सापडली. मग त्यात वाईट ते काय? तिने संन्यासिनी होऊ नये म्हणून ना तिला मठातून मी आणले? योग्य पतीशी तिचा विवाह करून देणे हे आता कर्तव्यच होते.

वालजीला रडू आले. त्याच्या डोळ्यांतून पाणी गळू लागले. लिलीचे लग्न लागले म्हणजे मी एकटा. कोण मग मला? वालजी एकटा राहील; परंतु म्हणून का लिलीचा संसार बंद करू? माझ्या सुखासाठी? छे! तिच्या आईच्या स्वर्गस्थ आत्म्याला मी वचन दिले आहे. लिलीचे सारे मला केले पाहिजे. मी एकटा राहीन; परंतु लिलीचे लग्न झाल्यावर मला जगायला तरी कारण काय? लिलीसाठी जणू माझे प्राण आहेत. नाही तर ते कधीच जाते. समुद्रातून मी तरलो. का? तिच्यासाठी. ती एकदा संसारात पडली म्हणजे वालजीचे कृतकृत्य जीवन एकदम समाप्तही होईल! कोणी सांगावे?

* * *

दुःखी : प्रकरण दहावे

# क्रांतीची ज्वाला भडकली

कामगारांत खूप अशान्तता होती. मालकांनी एकदम पगार कमी केले. तिकडे शेतकरी प्रक्षुब्ध होत होते. दुष्काळ पडला होता; परंतु दुष्काळातही सावकारांनी चालविलेल्या जप्त्यांचा सुकाळ सुरू होता. जिकडे तिकडे भुकेचे भूत स्वैर संचारू लागले. जगातील श्रमणाऱ्या किसान कामगारांची भूक शांत होईल तेव्हाच जगात शान्ती येईल.

दिलीपचे तरुण मंडळ एकत्र जमले. ते मित्र सर्व परिस्थितीचा विचार करीत होते.

'उठाव करावा, झेंडा उभारावा.' एक म्हणाला.

'परंतु ते शक्य आहे का ? पाऊल टाकणं सोपं. पुढं निस्तरणं कठीण.'

'शक्याशक्यतेच्या चर्चा करू तर कधीच काही हातून होणार नाही.

'आणि अपयश आलं तर ?'

'जगात एकदम यश कोणाला मिळालं आहे ? आपल्या अपयशातून भावी यश फुलेल. अशा अनुभवातूनच जग पुढं जात असतं. अनेक अपेशी प्रयत्नांतून एक दिवस यश उभं राहातं. शेकडो वेदनांतून, अपयशांतून समाजाची नवीन घडी निर्माण होते; नवीन क्रांती जन्मते. आपल्या त्यागातून व बलिदानातून उद्याच्या यशस्वी क्रांतीचा पाया घातला जाईल. आपण आज बी पेरू, उद्याच्या पिढीला कणीस मिळेल.'

'आपल्याजवळ साधनसामुग्रीही नीटशी नाही.'

'मोडकीतोडकी आहे ती पुरे. कामगारांनी इकडून तिकडून गोळा केली आहे. भूत बंगल्याची गढी करू व लढवू.'

'भूत बंगला नको. माहीमच्या बाजूस एक प्रचंड वाडा आहे. तिथं आपण सारे जमू. कामगारांची सारी पथकं तिथं न्यावी. वाडा पडला तर जवळच दुसराही आहे त्यात घुसू. त्याची गढी करू व लढू.'

'कोणता दिवस?'

'वर्षप्रतिपदेचा दिवस. त्या दिवशी शालिवाहन राजानं जय मिळवला. दंतकथा आहे की, त्या राजानं कुंभाराच्या मडक्यांचे घोडेस्वार केले व लढाई जिंकली. दंतकथेचा अर्थ इतकाच, लोकांची डोकी मडक्यासारखी झाली होती. डोक्यात ना तेजस्वी विचार, ना भावना; परंतु शालिवाहन राजानं त्यांच्यात तेज फुंकलं. तसे आपण शेतकरी, कामकरी आजपर्यंत धुळीत पडलो आहोत. आता उठू. झुंजार बनू. वर्षप्रतिपदेचा दिवस, त्या दिवशी क्रांतीचा झेंडा उभारू.'

सर्वांनुमते तो दिवस ठरला. गुप्त बैठकी होऊ लागल्या. कामगार संपावर गेले. वातावरण विजेने भरल्यासारखे झाले. सरकारी पलटणी व घोडेस्वार रस्त्यांतून हिंडू लागले. लोक भयभीत होऊन पाहू लागले. काही तरी भयंकर होणार असे वाटू लागले. भित्र्या श्रीमंतांनी आपली मुलेबाळे, बायकामाणसे परगावी पाठवली; परंतु गरीब कोठे जाणार?

दिलीप त्या क्रांतीत होता. त्या झटापटीत त्याला मरण आले तर? गोळी लागली, लाठी बसली तर? फाशी गेला तर? लिलीला शेवटचे भेटावे असे त्याला वाटत होते, परंतु त्याला वेळ नव्हता. त्याने लिलीला पत्र लिहिले; परंतु पत्र कोण नेऊन देणार? त्याने बाहेर पडणे धोक्याचे होते. छबी होती ती एकदम त्याच्यासमोर आली.

'काही काम आहे?' तिने विचारले.

'लिलीला हे पत्र नेऊन द्यायचं.' तो म्हणाला.

'किती कठीण काम!' ती म्हणाली.

'तू केलं पाहिजेस.'

'करीन; परंतु पुढच्या जन्मी तरी मला प्रेम द्या. या जन्मी लिली, पुढच्या जन्मी मी. पुढच्या जन्मी मला विसरू नका, दूर लोटू नका, माझा उपहास करू नका हो.'

छबी पत्र घेऊन गेली. दिलीपकडे किती तरी तरुण येत होते, जात होते. लिलीची तो वाट पाहात होता. रात्र पडली तरी लिलीचा पत्ता नाही.

दिलीप रात्री आपल्या मित्रांबरोबर त्या माहीमच्या वाड्यात गेला. उजाडत बंडाचा झेंडा, क्रांतीचा झेंडा त्या वाड्यावर फडकणार होता. वाड्यात क्रांतीचे सैनिक जमले होते. त्यांनी मोडक्यातोडक्या बंदुका दुरुस्त केल्या. चोरून आणलेला दारूगोळा तेथे होता. तेथे एक मोडकी तोफ होती. ती त्यांनी उभी केली.

आज शहरात लष्करी कायदा आहे. कोणी घराबाहेर पडायचे नाही. हुकूम आहे. ती पाहा सरकारी पलटण! त्या पाहा तोफा, ते घोडेस्वार! माहीमच्या रस्त्याला चालले लष्कर.

क्रांतिकारकांच्या वाड्यापासून काही अंतरावर सरकारी तोफा उभ्या राहिल्या. सूर्य वर आला. वाड्यावर क्रांतीचे निशाण झळकले. सूर्याने सोनेरी किरणांनी त्या झेंड्याला आलिंगन दिले. वाऱ्याने गाणे म्हटले. त्या वाड्यातून क्रांतिगीतांच्या घोषणा सुरू झाल्या. समोरच्या सरकारी तोफेतून गोळा सुटला. धुडूम धुडूऽम – आवाज झाला. वाडे हादरले, तावदाने खळकन् पडली. भिंतीवरची घड्याळे पडली. धुडूम धुडूऽम. तो पाहा एक गोळा झेंड्याला चाटून गेला. झेंडा पडू नये म्हणून तो पाहा एक वीर तेथे उभा राहिला. आला, गोळा आला! त्या वीराच्या चिंधड्या झाल्या. झेंड्याची या लाल तुकड्यांनी पूजा झाली. हुतात्म्याच्या रक्ताने झेंडा रंगू लागला आणि तो पाहा एक युवक! बारा-चौदा वर्षांचा असेल. सरकारची फौज व क्रांतिकारकांचा वाडा यांच्यामध्ये तो रस्त्यात उभा आहे. आगीच्या वर्षावात उभा आहे. सरकारी तोफांतून येणारे काही गोळे जमिनीवर पडत. जे फुटत नसत ते तो युवक उचली. टोपलीत भरून क्रांतिकारकांना नेऊन देई. शाबास त्याची. मध्येच तो आपली टोपी उडवी व क्रांतीचा जयजयकार करी. वाड्यातील क्रांतिकारक ब्युगुले वाजवीत. परंतु – अरे, तो पाहा लाल गोळा आला. त्या कोवळ्या मुलाचे तुकडे झाले. ते दशदिशांत उडाले. मरताना क्रांती म्हणून तो ओरडला. अणुरेणूतून तो आवाज घुमला. वाड्यावर गोळे पडत होते. वाड्याचा काही भाग पडला. काही लोक उघडे पडले. बंदुकींच्या फैरी झडू लागल्या. ती पाहा एक गोळी सूंऽ करीत आली. दिलीपला लागणार, लागणार. हे काय? कोणी तरी त्याला एकदम दूर लोटले व ती गोळी स्वतःच्या छातीवर घेतली. ती व्यक्ती पडली. दिलीप तिच्याजवळ गेला. कोण होती ती व्यक्ती?

अरे, ही तर छबी! ती पुरुषाचा पोषाख घालून आली होती. प्रियकराच्या रक्षणासाठी आली होती. त्याच्यासाठी प्राणार्पण करायला आली होती. रक्तबंबाळ होऊन ती पडली होती. दिलीप तिच्याजवळ बसला.

'तू माझ्यासाठी गोळी घेतलीस?'

'या उदरात प्रेम आहे. या गोळीच्या वेदना नाहीत. मी तर आता मरणार; परंतु एका गोष्टीची क्षमा करा.'

'तू माझ्यासाठी प्राण दिलेस. मी काय क्षमा करू?'

'तुम्ही लिलीसाठी चिठ्ठी दिलीत, ती मी नेऊन दिली नाही. मत्सर मनात आला. क्षम्य नाही का तो? एखादे वेळेसही लिलीचा मला हेवा नये का वाटू? तुमचं प्रेम तिला मिळावं व मला एक कणही नये का मिळू? परंतु ती चूक झाली. मी फसवलं तुम्हाला. ही पाहा ती चिठ्ठी. ही घ्या. क्षमा करा. म्हणा क्षमा म्हणून. जरा माझं डोकं तुमच्या मांडीवर घ्या. एक क्षणभर.'

त्याने तिचे डोके मांडीवर घेतले. तिने त्याचा हात हातात घेऊन प्राण सोडले. दिलीप उठला. लिलीला त्याचा शेवटचा निरोप शेवटी नाहीच मिळाला. कोण नेईल निरोप? एक तरुण तयार झाला. तो म्हणाला, 'मी जातो.'

तो तरुण कसा तरी गेला. मोठ्या शर्थीने लिलीच्या पत्त्यावर गेला. ती चिठ्ठी त्याच्या हातात होती. तो त्या घरात जाणार, इतक्यात वालजी तेथे भेटला.

'कोण पाहिजे?' वालजीने विचारले.

'ही चिठ्ठी द्यायची आहे.' तो तरुण म्हणाला.

'मी देतो.'

'नक्की द्याल?'

'हो.'

'मी जातो तर. तिकडे लढाई सुरू आहे.'

तो तरुण निघून गेला. वालजीने ती चिठ्ठी वाचली. लिलीच्या प्रियकराची शेवटची चिठ्ठी. लिलीच्या प्रियकराचे प्राण वाचवण्यासाठी त्याला जाणे प्राप्त होते. दिलीप जर मेला तर लिलीचा आनंद नष्ट होईल. लिलीसाठी दिलीपला जगणे जरूर होते. वालजीने चिठ्ठी तशीच स्वत:जवळ ठेवली. तो निघाला. तोही त्या क्रांतिकारकांच्या वाड्यात आला. त्यांच्यात तो मिळून गेला. ती

तोफ कोणाला नीट डागता येत नाही. वालजीने ती सुरू केली. क्रांतिकारकांकडचा तोफेचा गोळा! धुडुम धुडुम. इतक्यात वालजीच्या दृष्टीस कोण पडले? दोघे एकमेकांकडे पाहात राहिले.

'अहो, हा मनुष्य तुमच्यात कसा आला? हा तर सरकारी अधिकारी! म्हणूनच त्यानं तोफ निकामी केली. उडणार नाही असं सांगितलं. हा गुप्त पोलिस खात्यातील बडा अधिकारी आहे.' वालजी त्या पोलिस अंमलदाराकडे बोट करून म्हणाला.

क्रांतिकारकांनी त्याला बांधून ठेवले. त्याचा मागून निकाल लावू असे ठरले. लढाई सुरू होती. तो सारा वाडा उद्ध्वस्त होत आला. त्या वाड्यात राहाण्यात अर्थ नव्हता. जवळच्या दुसऱ्या वाड्यात घुसावे असे ठरले. मंडळी निघाली; परंतु त्या बांधलेल्या अंमलदाराचे काय करायचे? त्याला गोळी घाला असे लोक म्हणाले; परंतु वालजी म्हणाला, 'तो माझा वाटा आहे. सूड मीच घेईन.' इतरांनी बरे म्हटले. क्रांतिकारक बाहेर पडले. त्या दुसऱ्या वाड्यात ते घुसू लागले. बाहेरून सरकारी पलटणींनी गोळ्यांचा वर्षाव केला. प्रेतांचा खच पडला. बाहेर अंधार पडला. रात्र झाली. वाड्याचे दार एकदम बंद करण्यात आले.

इकडे वालजीने त्या अंमलदाराचे काय केले?

'आता मी तुमच्या ताब्यात आहे. घ्या सूड.' तो अधिकारी म्हणाला.

'मी तुम्हाला सोडून देऊन सूड घेतो.' वालजी म्हणाला.

वालजीने त्याला मुक्त केले. वालजी एकदम वाड्याबाहेर पडला. त्या दुसऱ्या वाड्यात तो जाणार, तो दरवाजा बंद! आणि त्याच्या पायाजवळ कोण? तो तर दिलीप! गोळीने जखमी पडला होता. त्याला शुद्ध नव्हती. बाहेर अंधार होता. वालजीने एकदम दिलीपला पाठुंगळीस मारले. तो वाड्याच्या पाठीमागच्या बाजूने निघाला. धुडुम धुडुम गोळे येत होते. बंदुकींच्या गोळ्या सूं सूं करीत येत होत्या.

वालजी जात होता. लिलीचे प्रेममय प्राण घेऊन जात होता. इकडे कोठे चालला वालजी? इकडे तर खाडी आहे. समुद्र आहे. ओहोटी होती. पाणी फारसे नसेल. वालजी पाण्यात शिरला. चिखल होता. मोठ्या कष्टाने पाऊल टाकीत तो चालला. तो पलीकडे आला. तेथे झाडांखाली तो बसला. त्याने दिलीपची जखम बांधली. त्याच्या डोक्यावर पाणी शिंपले. परंतु शुद्ध नाही.



ते पाहा कोण आले. चोर की काय?

'काय रे? तुझ्याजवळ काय आहे?'

'काही नाही. हे प्रेत आहे.'

'प्रेताच्या खिशात काय आहे?'

'बघतो. हे पाकीट आहे.'

'दे ते.'

वालजीने दिले. ते दोघे गेले. इतक्यात शिटी ऐकू आली. घोड्याच्या गाडीचा आवाज झाला. गाडी थांबली. तिच्यातून पोलिस व एक अंमलदार खाली आले. ते वालजीजवळ आले.

'हेच ते दोघे.' पोलिस म्हणाले.

'कोण दोघे?' वालजीने विचारले.

'चोर, पळालेले चोर.' पोलिस म्हणाले.

'मी चोर नाही. मी एका मरणोन्मुख माणसाला घेऊन बसलो आहे.'

'कोण, वालजी?' त्या पोलिस अंमलदाराने विचारले.

'होय. आता पुन्हा मी तुमच्या ताब्यात आहे. परंतु एवढं करा, या जखमी तरुणाला तुमच्या गाडीतून न्या. त्याच्या घरी पोचवा. मग मला वाटेल तिकडे न्या.' वालजी म्हणाला. 'हा तरुण म्हणजे दिलीप. त्या श्रीमंत जहागिरदारचा नातू. तो म्हातारा रात्रंदिवस याची आठवण काढून रडतो. त्याच्याकडे याला पोचवतो. चला, तुम्हीही बसा गाडीत.' अधिकारी म्हणाला.

गाडी चालली. त्या जहागिरदाराच्या बंगल्यावर थांबली. त्याला हाका मारण्यात आल्या. म्हातारा खाली आला.

'काय आहे?'

'हा तुमचा नातू घ्या. तो जखमी झाला आहे. जपा.'

'माझा नातू? कुठं आहे तो? जखमी झाला? कुठं आहे तो?'

'थांबा, घाई नका करू.'

त्या सर्वांनी दिलीपला वर नेले. तेथे खाटेवर ठेवून तो अंमलदार व वालजी खाली आले. गाडी निघाली.

'हे पाहा, वाटेत माझी खोली आहे. तिथं लिली आहे. तिला शेवटचा निरोप देईन. लगेच परत येईन. मग मला कुठंही न्या. फाशी द्या किंवा अंदमानात पाठवा. एवढी प्रार्थना मान्य करा.' वालजी त्या अधिकाऱ्याला म्हणाला.

'बरे.' तो अधिकारी म्हणाला.

गाडी थांबली. वालजी आत गेला. त्याने लिलीला उठवले. त्याने लिलीला सारे सांगितले. लिली रडू लागली.

'रडू नको. दिलीप वाचेल. दोघं सुखानं राहा. गरिबांवर प्रेम करा. लिल्ये, जातो हो मी. माझी आठवण ठेव.' असे म्हणून तो निघाला; परंतु तो रस्त्यात येऊन पाहातो, तो तेथे गाडी नाही! कोठे गेली गाडी? कोठे गेला अंमलदार? त्याने उपकार स्मरून का वालजीसही सोडले?

* * *



दुःखी : प्रकरण अकरावे

# अंमलदाराचा शेवट



वालजी लिलीला भेटायला गेला. तो अंमलदार गाडीत होता. आकाशात आता चंद्र उगवला होता. अंधारात आकाशातील प्रकाश आला. तो अंमलदार विचार करू लागला, 'या वालजीला का मी पुन्हा पकडू? पुन्हा त्याला जन्मठेप मिळेल. कितीदा पळून गेलेला; किती आरोप; परंतु हा का चोर ? हा का दरोडेखोर ? हा महात्मा आहे. या महात्म्याला का पुन्हा नरकात लोटू? काय आमचं हे पोलिसांचं जीवन! नेहमी दुसऱ्यांच्या पाठीमागं असायचं. जीवनातील ध्येय काय, तर कैदी पकडला, गुन्हेगार पकडला! आमची हृदयं शुष्क होतात, भावना मरतात. माणुसकी नष्ट होते, आम्ही पशू बनतो. गरिबांसाठी झगडणारे, त्यांच्यावर आम्ही पाळत ठेवतो. त्यांना क्रांतिकारक म्हणून पकडायचं, फाशी चढवायचं! आणि हे दुसरे गुन्हेगार यांचाही छळ आम्ही चालवायचा! परंतु ते क्रांतिकारकही गुन्हेगार नाहीत, हे चोर दरोडेखोरही गुन्हेगार नाहीत. ही समाजरचना गुन्हेगार आहे. एक श्रीमंतीत लोळतो. दुसरा अन्नाला मोताद होतो. का हे असं व्हावं? चोर, कोण चोर? चोरी करणारा चोर की आजूबाजूस उपासमार असूनही कोठारं भरून ठेवतो तो चोर? समाज ज्यांना चोर म्हणून शिक्षा ठोठावतो, ते चोर किती कर्तृत्वशाली, किती उदार, किती मोठ्या मनाचे! परंतु त्यांच्या अंगातील हे गुण मातीमोल होतात!

'आजपर्यंत मी किती पाप केलं! कितीकांना पकडलं; तुरुंगात लोटलं. गुन्ह्यांचा शोध लावण्यात मी पुरुषार्थ मानी. माणसांतील दिव्यता पाहाण्याचा शोध मी कधी लावला नाही; परंतु वालजीनं ती दिव्यता दाखवली. त्यानं

माझ्यावर सूड घेतला नाही. मला जा म्हणाला आणि त्याला का मी पुन्हा अडकवू? छे! फुकट माझं जीवन. हे जीवन समुद्रात फेकू दे. जगेन तर ही लागलेली सवय का जाईल? आणि आज हाती सापडलेला वालजी मी सोडला असं कळलं तर? बेअब्रू व्हायची. ती प्रतिष्ठाही जायची. नको, जगणं नकोच. मेल्याशिवाय या जन्मातील पाप विसरता येणं शक्य नाही. मला मरू दे. समुद्राच्या अनंत लाटा माझं जीवन स्वच्छ करतील. जा, वालजी जा. मला क्षमा कर. आजपर्यंत ज्यांना ज्यांना मी छळलं – त्या सर्व आत्म्यांनो, मला क्षमा करा.'

त्या अंमलदाराने हात जोडले. तो गाडीतून उतरला. त्याने त्या गाडीवानाला 'जा' सांगितले. गाडी गेली आणि तो अंमलदारही गेला.

कोठे गेला? तो समुद्रकाठी गेला. समुद्र उचंबळला होता. चंद्र मिरवत होता. त्या अंमलदाराचाही हृदयसिंधू उचंबळला होता, डोळ्यांतून धारा लागल्या होत्या. तो समुद्रात शिरला. पुढे पुढे चालला. सुटले पाय. लाटांनी त्याला नाचवले, उचलले, बुडवले, हृदयाशी धरले.

दुसऱ्या दिवशी ते प्रेत तीराला लागले. पोलिस आले तो तो अंमलदार! पंचनामा झाला. आत्महत्त्या – असा निकाल देण्यात आला. ती आत्म्याची हत्त्या होती का तो आत्म्याचा उद्धार होता? आंधळ्या दुनियेला काय कळणार, काय दिसणार?

'पोलिस अंमलदाराची आत्महत्त्या.' अशा शीर्षकाखाली दुसऱ्या दिवशीच्या वर्तमानपत्रांतून ती बातमी आली. वर्तमानपत्रविकणारे ओरडत होते. वालजीने ऐकले. त्याने वर्तमानपत्र विकत घेतले; ते घेऊन तो खोलीत आला. त्याने तो मजकूर वाचला. त्याने ते पत्र खाली ठेवले. तो गंभीरपणे बसला.

'आजोबा, असे का बसलेत?' लिलीने विचारले.

'संपलं सारं.' तो म्हणाला.

'काय संपलं? आता तर सुरू होईल सारं!'

'तुझं सुरू होईल. तुझा संसार सुरू होईल. परंतु आमचा संपला. तो गेला. आता मीही बहुधा लवकरच जाणार. माझंही जीवितकार्य जवळजवळ संपल्यासारखंच आहे. उगी, रडू नको लिल्ये. अग; जन्मला तो जायचाच एक दिवस! वेडी कुठली, उगी.'

❋ ❋ ❋



दुःखी : प्रकरण बारावे

# लिलीचे लग्न



क्रांतीचे प्रकरण संपले. सरकारने कोणासही शिक्षा केल्या नाहीत. कारण गोळीबाराने अनेक लोक आधीच मेले होते. कामगारांना पगारवाढ मिळाली. शेतकऱ्यांवरचे सावकारी अन्याय कमी झाले. कर्जाची चौकशी करण्याचे ठरले. जे न्याय्य कर्ज ठरेल त्यातील निम्मे बाद करायचे ठरले. सावकारांनी कांगावा केला, परंतु सरकारने लक्ष दिले नाही. कामगारांच्या संघटनेस मान्यता दिली गेली. शहाणपणाने सरकारने सूडबुद्धी स्वीकारली नाही. नाही तर सारे राष्ट्र पेटले असते.

दिलीपची जखम बरी होत आली होती. वालजी व लिली रोज जात असत. लिली दिलीपची जखम बांधी. सारे करी. तिचा हात हलका होता.

'पोरीला सारं येतं. किती मनापासून करते!' दिलीपचे आजोबा म्हणाले.

'ती आहेच गुणी.' वालजी म्हणाला.

लिली व दिलीप एकमेकांवर प्रेम करीत होती. कधी गाडीतून दोघे फिरायला जात. वालजीला वाटले की, यांचे लग्न होणे बरे. एके दिवशी तो दिलीपच्या आजोबांकडे गेला. दिलीप व लिली बाहेर गेली होती.

'काय लिलीचे आजोबा?'

'काय दिलीपचे आजोबा?'

दोघांना हसू आले. शेवटी हिय्या करून वालजीने प्रश्न काढला.

'दिलीपचं आता लग्न केलं पाहिजे.'

'माझ्याही मनात तेच येतं.'

'लिलीवर त्याचं प्रेम आहे.'

‘मी प्रेम वगैरे ओळखत नाही.’

‘मग काय ओळखता?’

‘पैसा!’

‘किती पाहिजेत पैसे?’

‘तुम्हाला सांगण्यात काय अर्थ?’

‘परंतु कळू दे तर खरा आकडा!’

‘मी माझी सारी इस्टेट दिलीपला देणार आहे. माझ्या इस्टेटीची जेवढी किंमत आहे तेवढी किंमत जो हुंडा म्हणून देईल त्याची मुलगी मी करीन. मी दिलीपला देईन तेवढीच भर मुलीच्या पालकानंही घातली पाहिजे. मी असा मनाशी संकल्प केला आहे आणि माझा स्वभाव असा आहे की, जे एकदा मनात धरलं ते कधी सोडायचं नाही!’

‘तुमच्या इस्टेटीची किती किंमत होईल?’

‘होईल एक लाख रुपये.’

‘एक लाख रुपये दिले तर लिलीला सून म्हणून पत्कराल ना?’

‘हो, पत्करीन.’

‘आता आणून देतो पैसे!’ असे म्हणून वालजी घरी गेला. त्याने एक जुना अंगरखा काढला. त्यात जिकडे तिकडे नोटाच आत शिवलेल्या होत्या. वालजीने एक लाख रुपयांच्या नोटांची पुडकी बांधली. तो ती पुडकी घेऊन आला. ‘घ्या मोजून!’ तो म्हणाला.

‘कुठून आणलेत हे पैसे?’

‘लिलीचा बाप कारखानदार होता. त्यानं ठेवले होते पैसे.’

म्हाताऱ्याचा आनंद गगनात मावेना. खरेच एक लाख रुपयांच्या नोटा! इतक्यात लिली व दिलीप तेथे आली. दिलीप आपल्या आजोबांजवळ बसला. लिली वालजीजवळ बसली.

‘लिलीचा हात मी पुढं करतो,’ वालजी म्हणाला.

‘मी दिलीपचा करतो,’ आजोबा म्हणाले.

‘काय करता हे?’ दिलीप व लिली म्हणाली.

‘तुमचं लग्न लावीत आहोत,’ दोघे म्हातारे म्हणाले.

* * *



दुःखी : प्रकरण तेरावे

# शेवट



लिली आता सासरी राहते; परंतु ती रोज वालजीकडे जाते. त्यांना जेवण नेते. त्यांच्याजवळ बोलत बसते. कधी कधी बरोबर दिलीपही असतो; परंतु वालजीचे दुर्दैव अद्याप सरले नव्हते.

एके दिवशी दिलीपकडे एक गृहस्थ आला.

'काय पाहिजे आपणाला?' दिलीपने विचारले.

'तुमच्याशीच खाजगी बोलायचं आहे,' तो नवखा म्हणाला.

'चला, वर बसू.'

दोघे वर गेले. एका खोलीत बसले. तो नवखा बोलू लागला,

'महाराज, ज्या मुलीजवळ तुम्ही लग्न लावलं, तिचा तो पालनकर्ता एक खुनी दरोडेखोर आहे. कुठून आणले त्यानं लाख रुपये? अहो, मी त्याला ओळखतो, कारण मी त्याच जातीचा! परंतु पुढं मागं तुमच्यावर आरोप, आळ येऊ नये, तुमच्यावर संकट येऊ नये म्हणून मी आज धोक्याची सूचना देण्यासाठी आलो आहे. त्या वालजीचा संबंध सोडा. त्याच्याकडे तुम्ही जाऊ नका. तुमच्या पत्नीस जाऊ देऊ नका. अहो, तो जो पोलिस अंमलदार आत्महत्त्या करून मेला म्हणून प्रसिद्ध झालं, त्यानं आत्महत्त्या नाही केली. त्याला या वालजीनं समुद्रात ढकललं. त्या धक्क्यावर दोघे उभे होते. यानं दिलं ढकलून! ज्या गाडीतून रात्री तुम्हाला आणण्यात आलं, त्या गाडीत हे दोघे होते. दोघे गाडीतून उतरून चांदण्यात फिरत गेले. वालजीनं त्या अंमलदाराला फसवून धक्क्याकडे नेलं व केलं ते कृष्णकृत्य! महाभयंकर माणूस!' तो नवखा सांगत होता.

'खरं का हे?' दिलीपने विचारले.

'मी खोटं कशाला सांगू? तुमच्यावर संकट येऊ नये म्हणून सांगतो. तुमचा नवीन जोडा सुखाचा नांदो. मी जातो.'

तो नवखा गृहस्थ गेला. थोड्या वेळाने वालजी आला. रोजच्याप्रमाणे आला. तो वर गेला. दिलीप व लिली काही बोलत होती. लिलीच्या डोळ्यांत पाणी आले होते.

'लिल्ये, काय झालं? प्रेमाचंच भांडण ना?'

कोणी बोलेना. तेथली ती स्तब्धता मारक होती.

'वालजी, आजपासून तुम्ही इथं येऊ नका. लिलीही तुमच्याकडे येणार नाही. तुम्ही खुनी व दरोडेखोर आहात. आज मला कळलं. अशांशी संबंध ठेवणं पाप आहे. तो कमीपणा आहे,' दिलीप म्हणाला.

'क्रांतीत हेच शिकलास वाटतं?

'ते काही असो. तुम्ही आहात की नाही खुनी व दरोडेखोर?'

'मी जातो. मी कुणीही असेन. मी कोण आहे ते देवाला माहीत. जातो लिल्ये. तुम्ही सुखानं राहा.'

वालजी उठला. तो निघाला. लिली पाठोपाठ जाऊ लागली.

'लिल्ये, मी पाहिजे असेन तर इथं बस. मी नको असेन तर त्यांच्या पाठोपाठ जा.'

लिली थबकली. तिला अश्रू आवरत ना. ती खोलीत जाऊन रडत बसली. ज्याने तिला लहानाचे मोठे केले, मध्ये तिच्यासाठी हालअपेष्टांशी, मृत्यूशी, गोळीबाराशी झुंज दिली, त्याच्यापासून ती दूर ओढली जात होती. वालजीच्या उपकारांच्या राशी, प्रेमाचे पर्वत लिलीसमोर उभे राहिले. ती दुःखाने गुदमरली. ती कावरीबावरी झाली.

वालजी खोलीत गेला. त्याच्या जीवनाचा तंतू जणू तुटला. हृदयात काही तरी तटकन् तुटल्यासारखे झाले. त्याने अंथरूण धरले. एक मोलकरीण काम करायला येई. ती खोली स्वच्छ करी, अंथरूण झाडी, पाणी भरी, काही खायला करून देई, वालजीच्या डोळ्यांत कृतज्ञता भरे.

लिलीचे कपडे, तिची लहानपणची खेळणी, तिची पुस्तके, सारे वालजीने आपल्या अंथरुणाभोवती गोळा करून ठेवले. तो लिलीची खेळणी हातात घेई व ती हृदयाशी धरी. माझी खेळकर लिली, पोरकी लिली, सुखात नांदो,

असे म्हणे. तिची पुस्तके तो उघडी. आपण लिलीबरोबर एखादे वेळेस कसे वाचीत असू, ती चित्रे कशी पाही, त्याला आठवे व त्याचे डोळे भरून येत. एखादे वेळेस लिली पाठीमागून येऊन डोळे कसे झाकी ते त्याच्या डोळ्यांसमोर येई. दिलीपची व तिची प्रेमवेल वाढत असता आपण दुसऱ्या देशात जाऊन राहू, इथं नको, असं म्हणताच ती कशी गळ्यात गळा घालून रडली व आपण इथंच राहू, नको दुसरीकडे, वगैरे कसं म्हणाली व मी 'बरं हो, इथंच राहू' कसं म्हटलं व ती कशी हसली ते त्याला सारं आठवलं. मी एकटा होतो. माझ्या जीवनात लिलीने प्रेम ओतले. मला कृतार्थ केले तिने. वालजीच्या मनात शेकडो स्मृती, शेकडो प्रसंग, शेकडो भावना!

आज वालजीला अस्वस्थ वाटत होते. लिलीची तो आठवण करीत होता. येईल का लिली भेटायला? येईल का देवाला दया?

दिलीपकडे तो मनुष्य आज पुन्हा आला होता. ज्याने वालजीबद्दल विष ओतले तो आज अमृत ओतायला आला होता.

'काय पाहिजे?' दिलीपने विचारले.

'तुमच्याजवळ बोलायचं आहे.' तो नवखा म्हणाला. ते दोघे वर गेले. तो नवखा बोलू लागला, 'महाराज, तुम्हाला मी मागं सांगितलं ते खोटं. केवळ द्वेषामुळं ते मी सांगितलं. वालजी महात्मा आहे. त्या पोलिस अंमलदारानं आपण होऊनच उडी घेतली होती. मी ते पाहिलं होतं. त्यानं उडी नाही घेतली. तो समुद्रात शिरला होता. वालजीचा मी द्वेष करीत असे. ती लिली माझ्याकडे होती. त्यानं माझ्याकडून नेली. तिच्या आईच्या सांगण्यावरून त्यानं नेली. त्याच्याजवळून अधिक पैसे मला पाहिजे होते. त्यानं पैसे न देता माझा अपमान केला. त्या अपमानाचा सूड घेण्याची मी प्रतिज्ञा केली. मी पूर्वीचा खुनी दरोडेखोर. लढाईत मेलेल्या शिपायांच्या अंगावरचे कपडे, दागिने चोरणारा मी. मी पुढं खाणावळ घातली; परंतु ती मोडून वालजीचा सूड घेण्यासाठी मी शहरात आलो. तुमच्या खोलीजवळ मी राहात होतो. वालजीचे तुकडे करणार होतो. परंतु पोलिस आले – जाऊ द्या त्या गोष्टी. वालजी महात्मा आहे. तुम्ही वर्तमानपत्रात मागं नाही वाचलं? एका निरपराधी माणसावर खटला भरला जात होता. वालजी तिथं उभा राहिला. लिलीला विचारा ते सारं, – ती सांगेल. तिला माहित असेल. तुम्हीही वाचलं असेल. तो हा वालजी. जा त्याच्याकडे.

तो मरणोन्मुख आहे. मरण समोर येईपर्यंत द्वेष धरावा, कोणाला छळाव? वालजीला का मरतानाही मी दुःख देऊ? तो मृत्युशय्येवर असताही का द्वेष धरू? त्याची तुमची ताटातूट केली हा सर्वांत मोठा सूड घेतला. वालजीला रडवलं. माझा सूड संपला. जा तुम्ही. त्याला मरताना भेटा.'

'बरं केलंस. तूही भलेपणानं वाग. तू माझ्या वडिलांचे न कळत प्राण वाचवले आहेस. रणांगणावर ते पडले होते. त्यांच्या अंगावरचे मुडदे तू दूर केलेस. त्यांना हवा मिळाली. तू त्यांच्या गळ्यातील साखळी नेलीस. परंतु त्यांचे प्राण दिलेस. मी तुला पैसे देतो. दुसऱ्या प्रांतात जा. प्रामाणिकपणं धंदा कर. हे घे पाच हजार रुपये. माझ्या वडिलांची इच्छा पूर्ण होवो. जा!' दिलीप म्हणाला.

तो खाणावळवाला पाच हजार रुपये घेऊन गेला. त्या रुपयांचा त्याला आनंद झाला, परंतु त्यापेक्षाही हृदय निर्मळ व हलके झाल्याचा त्याला अधिक आनंद झाला.

दिलीपने लिलीला हाक मारली.

'काय?'

'चल, आजोबांकडे जाऊ, त्यांचे पाय धरू. ते महात्मा आहेत. आज खरं कळलं.'

'चला. लौकर जाऊ. मला कसं तरी वाटत आहे. आजोबा भेटतील का?' दोघे निघाली. वालजीच्या खोलीजवळ आली. मोलकरीण तेथे होती.

'कसं आहे?' त्यांनी विचारले.

'तुम्हीच आत जाऊन बघा.' ती दुःखाने म्हणाली.

दोघे आत गेली. वालजी शान्तपणे डोळे मिटून पडला होता. हातात लिलीची खेळणी होती. दोघे दोन बाजूला बसली.

'आजोबा, – आजोबा, डोळे उघडा. ही तुमची लिली आली आहे. तिला आशीर्वाद द्या. शेवटचं प्रेमानं पाहा. आजोबा...' लिली दुःखाने हाक मारीत होती. वालजीने डोळे उघडले. प्रेमळ डोळे! त्याच्या तोंडावर प्रसन्नता फुलली. शेवटचा प्रकाश फुलला. पवित्र- शांत प्रकाश.

'लिल्ये, आलीस? मला वाटतच होतं की येशील. देव शेवटी सारं चांगलं करतो. दिलीप, आलास? बरं झालं. मला किती आनंद होतो आहे! आता मी सुखानं मरतो.' वालजी क्षीण स्वरात म्हणाला.

'आता मरू नका. तुम्ही आमच्याकडे चला. आम्ही तुमची सेवा करू.' लिली म्हणाली.

'लिल्ये, आता आशा नाही. तुझ्यासाठी प्राण घुटमळत होते. आता ते राहाणार नाहीत. लिल्ये, जप. दिलीप, एकमेकांस अंतर देऊ नका. परस्परांवर प्रेम करा. संशय नका एकमेकांचा घेऊ. कधी संशय आला तर तो फेडून घ्यावा आणि जगाला प्रेम द्या. चोर, दरोडेखोर, खुनी तेही थोर असतात. आपणात दिव्यता नसते ती त्यांच्यातून कधी कधी प्रगट होते. देवानं दिव्यता सर्वांच्या ठायी ठेवली आहे. प्रगट होण्यास वाव मिळत नाही. लिल्ये. तुझा हात दे हातात. दिलीप, तुझाही दे.'

लिलीचा व दिलीपचा असे ते दोन्ही हात वालजीने आपल्या हातात एकत्र धरले. आता बाहेर सायंकाळ झाली. मोलकरणीने घरात दिवा लावला. वालजी शान्तपणे पडून होता. 'लिल्ये, जगाला प्रेम द्या. प्रेम एक सत्य आहे. निरपेक्ष प्रेम. आत्म्याचं ते खरं वैभव हो, दिलीप.' पुन्हा वालजी थांबला. बाहेर बरीच रात्र झाली. लिली व दिलीप रडू लागली. त्यांचे अश्रू घळघळले. वालजीने ते अश्रू पाहिले.

'रडू नका बाळांनो, गरिबांसाठी असे अश्रू तुमच्या डोळ्यांतून येऊ देत. गरिबांचे संसार सुंदर करण्यासाठी झटा. समाजरचना बदला. समता आणा. मग ना कोणी चोर, ना दरोडेखोर. माणसाची विटंबना मग थांबेल. मनुष्याची दिव्यता फुलेल. लिल्ये, दिलीप, माझा तुम्हाला शेवटचा संदेश म्हणजे निरपेक्ष प्रेम जगाला द्या. प्रेम, प्रेम. एक प्रेम खरं आहे.'

संपले. तो पाहा एकदम एक तेजस्वी तारा खळ्कन आकाशातून तुटला. त्याची रेषा कशी तेजस्वी उमटली. त्या खिडकीतून ती दिसली. वरचा तारा खाली आला. खालचा वर गेला. एक महान आत्मा वर गेला. त्याला नेण्यासाठी का तो वरचा तारा खाली आला होता? जा, महान आत्म्या, जा. तुझा प्रेमाचा संदेश या संसारात चिरंतन राहील!



# साने गुरुजींच्या गोड गोष्टी : १ ते १०

### भाग पहिला : खरा मित्र

आवडती नावडती, तीन मडकी, न्याय देणारा गुराखी, गोसावी, सोन्याची साखळी आणि खरा मित्र अशा या सहा गोष्टी जिव्हाळा आणि ध्येयनिष्ठा निर्माण करतात.

### भाग दुसरा : घामाची फुले

या नऊ विविध गोष्टी म्हणजे मुलांना मेजवानीच! मनोरंजनाबरोबरच नीतिमूल्यांचे दर्शन घडविणाऱ्या या गोड गोष्टी प्रत्येकाच्या जीवनात ध्येय निर्माण करतील.

### भाग तिसरा : मनूबाबा

सिलास मार्नरची ही भावपूर्ण कथा. ज्यावेळेस जीवनाचा उपयोग एखाद्या ध्येयासाठी होऊ लागतो तेव्हाच जीवनाचा विकास होऊ लागतो. जीवनाला अर्थ प्राप्त होऊ लागतो.

### भाग चौथा : फुलाचा प्रयोग

कृष्णकमळीच्या फुलावर सोनेरी छटा उमटवून दाखविणाऱ्याला एक लाख रुपयांचे बक्षीस जाहीर केलेले होते. फुलाला मिळाले का ते? भावपूर्ण हृदयस्पर्शी कथा.

### भाग पाचवा : दु:खी

व्हिक्टर ह्यूगोच्या 'ले मिझरेबल' ची ही हृदयस्पर्शी कथा. वालजी चोर होता. एका साधूने त्याला आपली चूक सुधारण्याची एक संधी दिली आणि वालजीचा महात्मा झाला.

### भाग सहावा : सोराब नि रुस्तुम

वडील आणि मुलगा यांचे अनोळखी अवस्थेतील द्वंद्व आज जगात अजरामर झाले आहे. या पुस्तकातील इतर चार कथाही मनाचा वेध घेणाऱ्याच आहेत.

### भाग सातवा : बेबी सरोजा

जीवनात कितीही संकटे आली, आपत्त्या आल्या तरी सत्य सोडू नये, दलितांविषयी प्रेमभाव ठेवावा. परमेश्वरावर विश्वास ठेवावा. हे पटवून देणारी तामीळ भाषेतील हृदयस्पर्शी कथा.

### भाग आठवा : करुणा देवी

शिरीष करुणेला विसरला पण करुणेने कर्तव्याचा सुगंध दरवळत ठेवणारी आपली ज्योत सतत तेवत ठेवली आणि शिरीषच्या अंतरातील विझलेला दीप पुन्हा लावला.

### भाग नववा : यती कि पती

यती होण्यासाठी संसाराचा त्याग करण्याचा प्रयत्न विजयने केला; परंतु मुक्तीचा मार्ग आपल्या सारख्या भावनोत्कट वृत्तीच्या माणसाला अनुरूप नाही हे त्याला पटले.

### भाग दहावा : चित्रा नि चारू

चित्रा नि तिची मुसलमान मैत्रीण फातमा. मैत्रीच्या कर्तव्यापासून निर्माण झालेली चित्रा नि चारूची ही करुणरम्य कथा चित्राच्या वडिलांच्या प्रेमाचीही साक्ष पटविते.


## केशव भिकाजी ढवळे

श्रीसमर्थ सदन, पहिली भटवाडी, गिरगांव, मुंबई ४